# आपण आहों माणसें



लेखक
नारायण हरि आपटे



प्रकाशक
वासुदेव रामचंद्र पेंडसे
आपटे मंडळी पुणें.

१९४५ ]    [ मूल्य २ रुपये

प्रकाशक
वा. रा. पेंडसे
व्यवस्थापक-आपटे मंडळी, (कोरेगांव),
शाखा पुणें २.



श्री. ना. ह. आपटे यांचे

– पुढें येणारें वाङ्मय –

१ एकटी
२ भार्या
३ अभागी की अविचारी ?
४ लोकमित्र
५ व्यवसायतंत्र
६ संसारांत पदोपदीं
७ वैगुण्य

मुद्रक
जनार्दन गणेश जोशी
जनार्दन सदाशिव लि. चा प्रेस,
३९८ सदाशिव पेठ, पुणें २

जगांतील एक सामान्य माणूस

जो थोडासा ज्ञात आहे—

जो सर्वस्वीं अज्ञात आहे—

ज्याला मी अंतर्बाह्य जाणतों—

पण जो मला अद्यापि

नीटसा जाणतां

आला नाहीं

असा तो

**आनाह**

यास ही कृति अर्पण केल्यास विशेष

काय होईल?—कांहींच नाहीं.

म्हणून त्याला अर्पण.

लेखक.

# त्याचें असें झालें—

सुमारें वीसबावीस वर्षांपूर्वी **किर्लोस्कर खबर** मासिकाचे संपादन करीत असतांची गोष्ट. मुख्य संपादक श्री. शंकरराव किर्लोस्कर यांनीं Herbert N. Casson नामक लेखकाचें Human Nature हें पुस्तक मला वाचण्यास दिलें आणि त्याच्या आधारें **खबर** मासिकांत एखादी लेखमाला लिहिण्याचें सुचविलें.

कॅसन महाशय हे व्यावसायिक (व्यापार-उद्योग व वाणिज्य यां विषयीं) वाङ्मय निर्माण करणारे एक चांगल्यापैकीं लेखक. यांची भाषाशैली सोपी, संवादात्मक पद्धतीची व चटकदार. यामुळें वरील पुस्तक मला नाविन्यपूर्ण वाटलें व आवडलेंहि. नंतर त्या आधारें मीं खबरमध्यें **मानव स्वभाव-दर्शन** नांवाची लेखमाला लिहिली. शब्दशः भाषान्तर न करितां व कॅसन महाशयांच्या विचारांचें स्वारस्य जाऊं न देतां मीं सदर लेखमाला लिहिल्यामुळें ती त्याच वेळीं चांगली लोकप्रिय झाली व तिचें एखादें पुस्तक झाल्यास बरें अशा सूचनाहि आल्या.

यानंतर सुमारें वर्षा दोन वर्षांच्या आंत **पुरुषार्थ** मासिकाचे संपादक माननीय पंडित श्री. दा. सातवळेकर यांचें एक व्याख्यान **महाभारतांतील मानी पुरुष**—नांवाचें औंध मुक्कामीं ऐकलें. या व्याख्यानात व्याख्यात्यांनीं मनुष्यस्वभावाचें विविध चित्रण व्यास महर्षींनीं किती मार्मिकपणें केलें आहे याचें विवेचन फारच सुंदर प्रकारें केलें. नवलाची गोष्ट ही कीं, कॅसन महाशयांनीं Human Nature च्या ज्या काहीं प्रमुख खाणाखुणा निवेदल्या होत्या, त्यांचाच अनुवाद पंडितजींनीं केला होता ! आणि तो सर्व महाभारताच्या आधारें ! हें विचारसाम्य मला भारी हृदयग्राही वाटलें. त्याच दिवशीं रात्रीं मी पंडितजींशीं त्या विषयावर आणखी बोललों. त्यांनीं सांगितलें, "मनुष्यस्वभाव व मानसशास्त्र यांविषयीं प्राचीन वाङ्मयांत फारच विचार केलेला आहे. एकट्या महाभारताचें वाचन केलें तरी

अपूर्व व भरपूर माहिती मिळेल. शिवाय भगवद्गीता हा मानसशास्त्रावरील सर्वोत्कृष्ट ग्रंथ आहे. सारखा वाचीत सुटा म्हणजे त्याची योग्यता कळेल."

पंडितजींशीं झालेल्या संवादाचें तात्काळ फळ म्हणजे माझी संगदोष ही कादंबरी होय. गीतेच्या दुसऱ्या अध्यायांतील ६१-६२-६३ या श्लोकांत विकारांचा प्रक्षोभ व त्याचा परिणाम सांगितला आहे. संगदोष कादंबरींत त्याच आधारें नायकाची भूमिका रंगविली आहे. असो.

वाचकांपुढें येत असलेल्या आपण आहों माणसें या पुस्तकाची पूर्व तयारी ही अशी आहे. मानव-स्वभाव दर्शनाचें नवें पुस्तक काढावयाचें तर तें आपल्या इकडील विचारांना धरून असावें असें मनाशीं योजिलें व त्यानंतर महाभारत, कथासरित्सागर, गीता इत्यादिचें चांगलें वाचन केलें आणि इंग्रजीमधील Psychology संबंधींचेंहि कांहीं चांगले ग्रंथ अवलोकिले.

युरोप-अमेरिकेंत या शास्त्राला चांगलें महत्त्व आलें असून त्यासंबंधींचें संशोधनहि शास्त्रीय पद्धतीनें चालू आहे. चांगल्या अधिकारी लेखकांनीं केलेलें विवेचन अभ्यास करण्यासारखें आहे. कॅसन महाशयांचा Human Nature त्यापैकींच आटोपशीर असा ग्रंथ होय.

पाश्चिमात्यांचे मानसशास्त्रावरील विचार वाचल्यानंतर मनाला निश्चित वाटलें कीं, प्राचीन काळीं आमच्या ऋषींनीं म्हणजे तात्कालीन विद्वानांनीं या विषयावर गाढ विचार केलेला होता. त्यावर संकलित व केवळ त्याचीच चर्चा केलेले ग्रंथ संस्कृतांत नाहींत ही गोष्ट खरी; पण मनुष्यस्वभाव व मानसशास्त्र यांचा अभ्यास व दिग्दर्शन मात्र गाढ होतें. गीता ग्रंथ त्याची साक्ष आहे. महाभारतांत सर्वत्र तसले विचार विखुरलेले आहेत. हें मी दुराभीमानानें कांहीं तरी सांगत नाहीं; पण कॅसन महाशयांच्या विचारांना सन्मानार्थ अशीं वचनें मला सर्वत्र आढळलीं. आपण आहों माणसें याची रचना तशी द्विविध आहे. म्हणजे विचारांचा मुख्य भाग सोयिस्कर म्हणून Human Nature मधील; पण त्याबरचें सारें

विवेचन आपल्या प्राचीन विचार-संपदेला अनुसरून स्थलसंकोचामुळें घातलेली सारी अवतरणें मात्र कमी केलेलीं आहेत.

फार पूर्वीपासून माझें एक मत दृढ झालेलें आहे कीं, आमच्या कौटुंबिक जीवनाचा, सामाजिक धारणेचा वा राष्ट्रीय उत्कर्षापकर्षाचा विचार करितांना, योजना आखतांना वा मार्ग दाखवितांना पाश्चिमात्त्यांचे एतद्विषयक परिपक्क विचार आम्हीं जसेच्या तसे कित्यादाखल घेऊं नयेत; अर्थशास्त्र दृष्ट्या कच्चा माल देणें व त्याच्या बदल्यांत पक्का माल घेणें हें जसें अत्यंत हानीकारक व दारिद्र्यप्रद आहे, तशाच प्रकार वैचारिक देव-घेवीचा आहे. परराष्ट्राचे परिपक्क विचार त्यांना योग्य व लाभदायक असतील; पण आम्हांला ते तसेच लाभ देतील असें मानणें धोक्याचें आहे. या असल्या उसनवारीनें बुद्धीला परप्रत्ययाची चटक लागते व हीन मनोगंडहि निर्माण होतो. ज्यांची व आपली संस्कृति, धर्म, आचार विचार, भौगोलिकस्थिति एक नाहीं, त्यांचे त्यांच्या परिस्थितींतून निर्माण झालेले प्रश्न व त्यावरचे उपाय आम्हांला कसे फलप्रद होणार?—आम्हीं समंजस-पणानें अवधान राखलें पाहिजे.

परक्यांचे पक्के विचार स्वीकारल्यानें काय अनर्थ होतो, याचा शोध घ्यावयाचा असल्यास प्रख्यात इंग्रज मानसशास्त्रज्ञ मॅक्डुगल यांचा Psycho-Analysis and social Psychology हा ग्रंथ पाहावा. या ग्रंथांत फ्रॉईडच्या लैंगिक मानसशास्त्रावरील मतांचा समाचार घेतला असून त्या मतांचा परिणाम इंग्लंड—अमेरिकेंतील तरुण पिढीवर किती वाईट झाला आहे, याचें स्पष्ट वर्णन आहे. या दृष्टीनें लाला लजपतराय यांचें Unhappy India हें पुस्तक व त्यांतील पाश्चिमात्यांची sexual urge हें प्रकरण पाहाण्यासारखें आहे.

पाश्चिमात्यांची ज्ञानसंपन्नता आदरार्ह निःसंशय आहे; पण त्यांतील मालाची उचल पक्क्या स्वरूपात करावयाची नाहीं. कच्चा माल घेऊन तो

आपल्या भट्टींत घालावयाचा व पक्का करावयाचा. असा त्याचा क्रम असावा. जपाननें याप्रमाणें केलेलें आहे. असो.

आपण आह्मीं माणसें या पुस्तकाची रचना त्या धर्तीची आहे. कॅसन महाशयांचा आधार घेतला आहेच; पण त्यांच्या विचारांचा विपर्यास न करिता आपल्या प्राचीन ज्ञानसंपदेशीं त्यांचा समन्वय केलेला आहे. हा प्रयत्न पूर्ण वा निर्दोष झालेला आहे, अशी शेखी नाहीं. दुसरी गोष्ट कॅसन महाशयांची मानव स्वभावाची पाहाणी Business ला धरून आहे. मीं केवळ सर्व साधारण वाचकाची आवश्यकता ध्यानीं घेऊन आपल्या परिस्थितीला जुळण्यासारखा विचार केलेला आहे. यामुळें विचारदिग्दर्शनांत पुष्कळच वेगळेपणा आलेला आहे. असें असलें तरी या पुस्तकाला मूळ कारण Human Nature हें पुस्तकच. याबद्दल मी कॅसन महाशयांचा मनापासून आभारी आहें.

एवढें सांगून पुस्तक वाचकांच्या हातांत देतों.

कोरेगाव }<br>
१८६६ }

**नारायण हरि आपटे.**

माणूस असा आहे




तो याकरितां आहे.

# आपण आहों माणसें !

## प्रकरण पहिलें

### १

कांहीं गोष्टी स्वयंसिद्ध असतात. मृगनाभीचा आमोद आल्हाददायक असतो, हें सिद्ध करण्यास शपथेची आवश्यकता नसते म्हणतात तें याच दृष्टीनें. चंद्रबिंबाचें मनोहारित्व कोणीं कोणाला सांगायला का पाहिजे ?

सृष्टींत सर्वत्र भरलेलें अद्भुतरम्यत्व असेंच स्वयंसिद्ध आहे. पण नवलाची गोष्ट अशी कीं, तें प्रतीत होण्याचें भाग्य फारच थोड्यांना लाभतें. एक गंमत पाहा ना. "जगांत आश्चर्यें किती ?" असा जर प्रश्न टाकला, तर—जग अनंत आश्चर्यांचें भांडार आहे; असें उत्तर मिळण्यास हवें. पण तसें मिळतें का ?—नाहीं. जगांत सात आश्चर्यें आहेत; असें आपण सांगतों, ऐकतों. अर्थात् हा संकेत पाश्चिमात्त्यांचा आहे. इजिप्तमधल्या पिरामिड्स्, चीनची अजस्र भिंत, बॅबिलॉन येथील लोंबत्या बागा, ऱ्होड्स बेटांतील दीर्घकाय पुतळा इत्यादि गोष्टी युरोपीय प्रवाश्यांना आश्चर्यकारक वाटल्या म्हणून त्यांनीं सप्ताश्चर्यांचा संकेत निर्माण केला. पण या दृष्टीनें विचार केल्यास आपल्याकडील अजिंठ्यांतील लेणीं, श्रवण-बेळगुळा येथील जैन तीर्थंकराची मूर्ति किंवा मदुरेचीं देवळें इत्यादि शिल्पहि आश्चर्यांत जमा होण्यासारखें नाहीं काय ?

तेव्हां जगांतील आश्चर्यांची संख्या केवळ सात आहे असें समजण्यांत कांहींच अर्थ नाहीं. जुन्या संकेताचा आदर करण्याकरितां वाटल्यास सप्ताश्चर्यांची कल्पना चालू ठेवावी; पण भूपृष्ठावर मानवजातीचा पसारा

अवाढव्य आहे व त्या मानानें भिन्न भिन्न देशांत अनेक भव्य शिल्पकार्यें किंवा चमत्कृतिजनक वास्तु त्या त्या मानवजातीनें निर्माण केलेल्या आहेत, ही सत्य गोष्टहि दृष्टिआड करूं नये. एवढें मान्य केल्यास जगांतील आश्चर्यांची संख्या सातावरून सातशेंपर्यंतहि जाऊं शकेल.

याशिवाय आश्चर्यांची आणखी गणना करावयाची झाल्यास सृष्टींतील अद्‌भुतरम्य रचना, तिच्यांतील विविधता नी विचित्रता आणि त्यांच्या पोटीं सामावलेलीं लहानमोठीं आश्चर्यें यांचा विचार कां न करावा ?

आणि सध्याचें विसावें शतक ! अखिल मानवजातीनें मधमाशी-प्रमाणें झटून प्राप्त केलेलें प्रचंड ज्ञान आणि त्यांतून निर्माण झालेले शास्त्रीय शोध यांनीं तर आश्चर्यांची परम सीमाच गांठली आहे ! मग त्यांची उपेक्षा तरी कशी करतां येईल ?—तात्पर्य, जग अनंत आश्चर्यांचें व ऐश्वर्यांचें भांडार आहे—केवळ सात आश्चर्यांपुरतें मर्यादित नाहीं, असें मानणेंच सयुक्तिक होय.

आश्चर्यें—तीं निसर्गनिर्मित असोत किंवा मानवनिर्मित असोत—अपरंपार आहेत यांत शंकाच नाहीं. आणि त्यांची परस्पर गुंतागुंतहि एवढी विलक्षण आहे कीं, तिलाहि अंत ना पार ! अशा अवस्थेंत या सर्व जंजाळाचें मूळ शोधणें किती कठिण–किती अशक्य–आहे, नाहीं ?—परंतु गंमत ही आहे कीं, अनंत विश्वांतील, अनंत आश्चर्यांचें मूळ चटकन् दिसण्याइतकें स्पष्ट आहे.

हें मूळ–हा मध्यबिन्दु = माणूस !

किंवा असेंहि म्हणतां येईल: सबंध विश्वांत एकच एक आश्चर्य असून बाकीचीं अनंत आश्चर्यें त्याचे पर्याय होत !

थोडा विचार केला म्हणजे सुजाण मनाला हें सहज पटेल कीं, माणूस एवढें एकच महान् आश्चर्य असून, बाकीचें सारें, त्याची छाया आहे !

विश्व हें असीम असें वर्तुळ. आणि त्याचा मध्यबिंदु माणूस. वर्तुळाचा परिघ कल्पनातीत. पण मध्य स्पष्ट दिसणारा !

माणूस महान् आश्चर्य खरेंच. पण त्याच्यावर महान् नवलाचें एक कवच आहे, असें सांगितल्यास थोतांड वाटेल. पण वस्तुस्थिति तशीच आहे. माणसाच्या भोंवतालचें नवलाचें कवच म्हणजे—

**त्यानें स्वतःविषयीं फारच थोडा विचार केला आहे हें !**

पुन्हां यांत आणखी एक चमत्कार: माणसानें स्वतःविषयीं जो कांहीं थोडासा विचार केला आहे, त्यांत त्याला आपण **कसें आहों ?** याचा उलगडा नीट पडलेला नाहीं. हें विधान अतिशयोक्तीचें वाटतें का ?— स्वतःकडे पाहा. भोंवतालच्या माणसांकडे पाहा. एकूण मानवजाती लक्षांत आणून विचार करा. काय आढळेल ?

स्वतःविषयीं माणसाला जें कांहीं वाटतें तें खरें असतें का ?—तो भोंवतालच्या माणसाविषयीं जी कांहीं बरीवाईट कल्पना करितो ती तरी खरी असते का ?—सर्वसाधारण मानवजातीविषयीं त्यानें बांधलेलीं अनुमानें वस्तुस्थितीस धरून असतात का ?—नाहीं ! नाहीं ! ! नाहीं ! ! !

काय कारण ?—एकच. माणसानें स्वतःविषयीं फारसा विचार केलेला नाहीं आणि जो केलेला आहे तो फारसा बरोबर नाहीं.

माणूस ! आश्चर्यांची खाण आहे ! त्याचें मन एक अजब कारखाना आहे ! त्या मनाचे व्यापार अकटोविकट आहेत !— आणि म्हणूनच मानवस्वभाव हा अनेक घटनांचा एक महान् ग्रंथ आहे !

मनुष्याच्या बुद्धीची प्रखरता, त्याच्या कल्पनेची भरारी, त्याच्या कर्तृत्वाची विशालता आणि आशाआकांक्षाची विविधता पाहावी न् थक्क होऊन पाहात राहावें ! मग वाटतें : असा कर्तुमकर्तुम् जीव स्वतःविषयीं इतका अंध— इतका अज्ञानी असावा अं ?—कस्तुरीमृगाला स्वतःच्या बेंबींतच कस्तुरी आहे, याचें भान नसतें म्हणतात; पण तो त्या सुगंधानें

मत्त होऊन इतस्ततः भटकत फिरतो. माणसाचें असेंच आहे का ? अखिल विश्वांतील अनंत आश्चर्यांचा गाभा आपणच आहों, हें जाणून न घेतांच त्यानें आपल्या ज्ञानाचा व अस्तित्वाचा एवढा पसारा मांडलेला आहे का !

काय सांगावें !—एवढें खरें कीं, मनुष्य स्वतःविषयीं प्रांजल विचार करूं लागतांच —गडकऱ्यांनीं म्हटल्याप्रमाणें

**यावज्जीवहि " काय मी ? " न कळलें आप्तांप्रतीं नीटसें !**
**मित्रांतेंहि कळे न गूढ—न कळे माझें मलाही तसें !!**

असे खेदोद्गार तो काढतो नी हताश होऊन पुढें म्हणतो—

**अज्ञाता ! मरणोत्तरीं प्रगट तें होईल तूंतें कसें ?**
**कोठें आणि कधींतरी जगतिं मी होऊन गेलों असें !**

## २

" मी विश्वांचा मध्यबिन्दु आहें ! " अशी शेखी माणसानें मिरवली तर ती फुकाची—अहंमन्यतेची—ठरेल. का ?—उत्तर अस्तिपक्षीं द्यावें तरी पंचाईत. नास्तिपक्षीं द्यावें तर ?—फारच पंचाईत !

मुंगीच्या मानानें माणूस फार मोठा आहे यांत शंका नाहीं पण हत्तीसारख्या प्राण्यापुढें तो तुच्छच नाहीं का ?—मग सृष्टीच्या एकंदर संसारांत तो तुच्छ—तुच्छतर—तुच्छमयच ठरला तर काय नवल ?

विश्वरचनेचा विचार करतांना शास्त्रज्ञ स्पष्ट सांगतात कीं, आपला भूगोल हा विश्वाच्या व्यापांत रतिमात्राचा कोट्यांश असेल नसेल !—अशांत त्या भूगोलावर राहणारा द्विपाद—छेः ! त्याच्या तुच्छपणाची कल्पनाच करवत नाहीं !

होय. सृष्टींतील अनंत ऐश्वर्य भोगणारा आणि प्राणिमात्रांत श्रेष्ठ असा कोणीतरी स्वामी पाहिजे म्हणून जगच्चालकानें आपल्या प्रतिकृतीचा एक जीव तयार केला, तो मनुष्य अशी एक गोड कल्पना माणसानेंच करून घेतलेली आहे. पण ती साफ खोटी आहे असें आजच्या व्युत्पन्न शास्त्रज्ञांचें स्पष्ट मत आहे. प्रख्यात खगोल-शास्त्रज्ञ जेम्स जीन्स आपल्या एका निबंधांत म्हणतो—" सृष्टिरचनेचा विचार करितां एक गोष्ट स्पष्ट आढळून येते कीं, विश्वरचनेंतून हळू हळू माणसाची निर्मिती व्हावी, असा कोणताच कार्यकारणभाव दिसत नाहीं. जीवोत्पत्ती ही एक सहज घडलेली इष्टापत्ति आहे. त्यांत ' मानव ' हा प्राणी तर अगदींच उपरा वाटतो. विश्वाच्या कारखान्यांत माणूस बनवणें हा हेतू किंवा विचार अजीबात आढळत नाहीं !" *

दर्शनीं विचित्र वाटणाऱ्या या विधानाची सत्यता पाहावयाची असल्यास मनुष्य व निसर्ग यांच्यांत चाललेला झगडा पाहावा. सुखानें जगतां येईल, सुलभतेनें रक्षण होईल आणि विस्तार सहज होत जाईल, असें कोणतेंहि साधन वा मार्ग निसर्गानें माणसाला ठेवलेला नाहीं ! सारखा एकच एक घोष ! झगडा ! झगडा ! ! झगडा ! ! ! जन्म कसा होतो, कळायचं नाहीं. मृत्यु केव्हां येईल, समजायचें नाहीं ! पण त्या दरम्यान जें जगणें त्यांत काय ? सारखी ससेहोलपट !—मग सृष्टींतील सुखें भोगायला माणूस निर्माण केला, असें म्हणण्यांत वा मानण्यांत अर्थ काय ?

पण काय नवल ?—सूर्यप्रकाशाइतकें वरील सत्य ठळठळीत असतांहि माणूस दंड थोपटीत म्हणतो, सृष्टीची रचना कांहींहि म्हणो वा मजविषयीं केवढीहि तुच्छता दाखवो, मी विश्वाचा मध्यबिन्दु आहें हेंच खरें ! मी आहें म्हणूनच विश्व आहे—

---

* प्रो. जेम्स जीन्स कृत—The Mysterious Universe पृष्ठें १३ ते २५ पाहा.

हें आज लाभलें आतां तो जोडीन मनोरथ
हें आहे तेंहि होईल माझेंचि सगळें धन।

* * *

मी स्वामी आणि मी भोक्ता सुखी मी सिद्ध मी बळी
कुलीन मी चि संपन्न माझी जोडी कुठें असे ?

गीताई १६–१३·१५

गीतेच्या उच्च अशा तात्त्विक भूमिकेवरून वरील दर्पोक्ति तमोमय आहे हें खरें व सुज्ञांना ती अमान्य नाहीं; पण दुसऱ्या एका दृष्टीनें ती सार्थ वाटण्यासारखी परिस्थिति आहे हेंहि विसरून चालणार नाहीं.

मानवजातीच्या बुद्धीचा व्याप व ज्ञानाचा अवाढव्य विस्तार काय दर्शवितो ?—द्रष्टा असला तर दृश्याला मूल्य. एरव्हीं सारें शून्यच नाहीं का ?—माणसानें सृष्टि पाहिली, जाणिली व उपभोगली म्हणूनच तो भोक्ता व ती उपभोग्य असें नातें जमलेलें नाहीं का ?—मानवेतर प्राणी व मानव यांच्यामध्यें ज्ञानामुळेंच अंतर पडत गेलें ना ?

ज्याला मन आहे व जो मनन करूं शकतो तो मनुष्य अशी व्याख्या माणसानें आपल्या कर्तृत्वानें सिद्ध करून दाखविली आहे आणि या गोष्टीचा त्यानें ज्या दिवशीं प्रारंभ केला, त्या दिवशीं तो केवळ द्विपाद-प्राणी राहिला नाहीं.

सृष्टीची रचना कोणत्याहि कारणानें झालेली असो, जीवमात्राची उत्पत्ति कांहींतरी आडमाप असो आणि त्यांतून मानवप्राणी अगदीं उपट-सुंभाप्रमाणें अवतरला असो, एवढें निश्चित कीं, मनाचा योग्य उपयोग केवळ मानवानें केला ! पंचज्ञानेंद्रियें नी पंचकर्मेंद्रियें आणि मन सर्व प्राणी-मात्राला आहेतच; पण त्यांची जुळणी करून सृष्टींतील एकेक आश्चर्य ओळखणें, त्याची फोड करणें आणि त्याचा उपयोग स्वतःकरितां करणें या गोष्टी मानवानेंच केल्या, ही गोष्ट नाकारितां येत नाहीं.

माणसानें अग्नीचें स्वरूप व गुण ओळखतांच त्यास आपला सेवक बनविलें ! एवढा मोठा हा सर्वभक्षक राक्षस; पण मनुष्य असा बिलंदर कीं, त्यानें त्याला आज एवढ्याशा काड्याच्या पेटींत कोंबलें आहे व अगदीं हुकमी सेवक करून ठेविलें आहे !

स्वर जवळ जवळ सर्व प्राण्यांची मिळकत; पण त्यांतून भाषा, विचार, संगीत आणि वाङ्मय निर्माण करण्याचें साधलें केवळ माणसालाच ! उगीच वर्णन तरी किती करावें ! मननाच्या बलावर माणसानें आपलीं ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें इतकीं उपयुक्त केलीं कीं, त्याची सीमा सांगतां येणार नाहीं व उपमा देतां येणार नाहीं. माणूस म्हणजे माणूस !—म्हणूनच तो स्वतःला विश्वाचा मध्यबिंदु मानतो. **आपण मेलें नी जग बुडालें !** अशी निराशेची पण अहंकारयुक्त म्हण तो वापरतो त्याचेंहि कारण अन्य नाहीं.

या स्थानीं इसापच्या एका गोष्टीची आठवण होते. एकदां माणसाची व घोड्याची गांठ पडली. दोघांचे कुशल प्रश्न झाल्यावर माणूस साळसूदपणानें घोड्याला म्हणाला, “ गड्या, तुझें डौलदार शरीर, पळण्याची गति आणि लढाऊ वृत्ति ह्या गोष्टी तुला कां प्राप्त झाल्या आहेत, जाणतोस ?—” घोड्यानें बुचकळ्यांत पडून नकारार्थी मान हालविली. तेव्हां माणूस म्हणाला, “ तूं माझ्या उपयोगी पडावेंस म्हणून. तुझी पाठसुद्धां पाहा कशी बाकदार आहे !—मला आरामानें बसतां येईल ! चल, आजपासून तूं नी मी जिवलग मित्र. हा मी तुझ्या पाठीवर किती झकास बसतों पाहा—” असें म्हणत त्या स्वभावतः उमद्या प्राण्याला माणसानें कुरवाळलें, चुचकारलें, त्याच्या पुठ्यावर थाप दिली व तो त्याच्यावर झटकन् स्वार झाला !

माणसानें सबंध सृष्टीशीं नातें जोडलें आहे तें या पद्धतीनें. तो स्वामी नी समृद्धशालिनी सृष्टि त्याची सेविका !

# ३

—माणूस ! —मोठा विचित्र प्राणी !

—काय स्वभाव आहे !

—कल्पनासुद्धां नव्हती या तऱ्हेवाईकपणाची !

मानवस्वभावाची काय गंमत आहे पाहा. मनुष्यस्वभावासंबंधीं बोलणें निघालें कीं, वरील अर्थाचे उद्गार आपण सहजीं काढतों, ऐकतों. अर्थात् बहुतेक वेळीं हे बोल टीकेचे, चेष्टेचे, सखेदाश्चर्याचे किंवा रागाचे असतात; पण त्यांचा डौल असा कीं, बोलणारी व ऐकणारी व्यक्ति जणूं मनुष्य नाहींच ! स्वतःच्या डोळ्यांतील मुसळ दिसायचें नाहीं पण दुसऱ्याच्या डोळ्यांतील कुसळ दिसायचें ! नवलच नव्हे का !

जगांतील कोणत्याहि आश्चर्याचा ठाव घेतल्यावांचून राहावयाचें नाहीं, अशा बाण्यानें वागणारा मनुष्य स्वतःच्या बाबतींत केवढा अंध !—स्वतःच्या आचारांविचारांच्या चौकटींत जें न बसेल, असें इतरांचें कोणतेंहि वर्तन वा बोलणें सर्वसाधारण माणसाच्या मनाला मोठें चमत्कारिक वाटतें, त्याच्या आकलनशक्तीला धक्का बसतो, आणि तो वरीलसारखे उद्गार काढतो.

हा प्रकार परस्परांना तिऱ्हाइत असलेल्या माणसांच्या मध्येंच घडतो असें नव्हे; तर अगदीं निकटच्या माणसामाणसामध्येंहि अनुभवास येतो. मग तीं माणसें प्रेमानें, नात्यानें, रक्तसंबंधानें, मित्रत्वानें वा जीवनांतील व्यवहारानें कितीहि एकत्र आलेलीं असोत.

माणूस—विचित्र प्राणी खराच !

आणि त्याचा स्वभाव—तोहि विचित्रच !

मानव-स्वभाव-दर्शनाची ही गंमत नीट समजून घ्यायची

झाल्यास आपणांस अगदीं मुळांत गेलें पाहिजे. मानवजातीच्या जगभर पसरलेल्या वटवृक्षाचें मूळ एवढ्याशा घरांत आहे. नव्हे ?—मग मानव-स्वभावाच्या विविधतेचें व वैचित्र्याचें मूळ तेथेंच आहे, हें काय सांगायला पाहिजे ?

स्त्री + पुरुष = पूर्ण मनुष्य

पत्नी ⁕ पति = संसार

संसार + जीवनकलह = मानवजातीचा विस्तार.

यावरून काय दिसतें ?—मानव दुभंग आहे. स्त्री नी पुरुष हीं त्याचीं दोन भकलें ! एकलेपणांत कोणीहि पूर्ण मनुष्य असू शकत नाहीं. तीं एकरूप झालीं तरच मानवाचा अवतार ! नाहींतर दोघेंहि शून्य ! एक म्हणजे शून्य. दोन म्हणजे एक, आणि तीन म्हणजे गर्दी. या आंकडे-मोडींत विनोद असला तरी तो समर्पक नाहीं असें कोण म्हणेल ?

पण यावर मनांत प्रश्न असा येतो कीं, पतिपत्नीसंबंधांत दोन म्हणजे एक हें जर खरें, तर त्या एकांत स्वभावाची एकवाक्यता कां असू नये ?—पण गमंत ही कीं, या मुळातील द्वैतांतच स्वभाववैचित्र्याची मेख असते आणि ती तशी असते म्हणूनच दाम्पत्यप्रेम उद्भवतें !

एकसारखेपणा सृष्टीला मान्य नाहीं. विविधता, विचित्रता आणि विसंगति हें तिचें जीवनध्येय आहे ! मनुष्यस्वभावालाहि तोच नियम लागू आहे. प्रेम, विश्वास, सहकारिता, ममत्व, त्याग व आनंद यांचा जन्म स्वभाववैचित्र्यानेंच होतो; आणि याच्या उलट रागद्वेष, गैरसमज, तुटकपणा, शत्रुत्व, स्वार्थ व वैताग यांचाहि पसारा वैचित्र्याच्या पोटीं असतो ! अग्नीनें दाह होतो व सौख्यहि होतें. तसा प्रकार आहे. उपयोग करणें वा करून घेणें माणसाच्या हातीं.

मानवस्वभावाविषयीं विचार करितांना एका अमेरिकन लेखकानें --हा ऑलिव्हर वेंडेल होम्स असावा--एक गंमतीचा परंतु मार्मिक विचार केला आहे. तो म्हणतो, ज्यावेळीं दोन माणसांचा परस्परांशीं संबंध येतो व तीं एकमेकांस जोखूं लागतात, त्यावेळीं तेथें केवळ दोनच माणसें असतात असें नाहीं. तर तेथें सहा माणसें असतात ! प्रणयानें धुंद झालेलें दाम्पत्य असेना. दोन म्हणजे एक नव्हे, तर सहा !

उदाहरणार्थः--मालती-माधवाची जोडी घ्या. दोघेंहि एकत्र आलीं कीं, तीन मालती नी तीन माधव यांचा तो सामना असतो !

मालती मुळांत असते नी एक. ती स्वतःला समजते त्या पद्धतीची मालती क्रमांक दोन, आणि माधवाच्या दृष्टीनें तयार झालेली मालती असते, ती क्रमांक तीन !

असाच क्रम माधवाचा असतो. एक, जगांतला माधव. दुसरा, माधवाचा माधव, आणि तिसरा मालतीचा माधव !

वरील प्रकार म्हणजे केवळ कांहींतरी कौतुक नव्हे. थोडा विचार केला म्हणजे समंजस मनाला पटतें कीं, दोन व्यक्ति स्वभाववैचित्र्यामुळें सहा असूं शकतात ! पाहा ना, मालती मुळांत जशी असते तशी ती तिला माहीत नसते व माधवालाहि नसते. तसेंच माधवाचें. मग एका जोडप्यांत आणखी दोन जोडपीं सामावलेलीं असतात, असें मानण्यास अडचण कां वाटावी ?

दोन व्यक्तींचा हा गुणाकार. मग नित्याच्या व्यवहारात व्यक्तींची संख्या जों जों वाढेल तों तों गणितश्रेढीनें त्याची किती वाढ होईल व स्वभावांचा केवढा संकर होत असेल, याची कल्पनाच करावी.

एका एक कधीं जसें दिसतसे स्वांतीं विकारांतरें।
अन्या तें न दिसे तसेंच; असतें ज्याचें तयातें खरें !

ही गडकऱ्यांची उक्ति ध्यानीं आणून आपण स्वतःकडे व इतरांकडे पाहण्याचा आपला दृष्टिकोन सुधारला पाहिजे.

**मानव-स्वभाव-दर्शनाचा** विचार या दृष्टीनें झाला पाहिजे. म्हणजे स्वभावाची विविधता व विचित्रता आपल्यास हवी तशी उपयुक्त करतां येईल. लोकाग्रणींना हें सहज साधतें. किंबहुना ज्या माणसाला मानव-स्वभावांतील ही मख्खी जितक्या प्रमाणांत कळेल, तितक्या प्रमाणांत त्याला महत्त्व मिळत जाईल आणि त्याला दुसऱ्याची व दुसऱ्याला त्याची संगत सुखावह आणि उपयुक्त होत जाईल.

प्रत्येकानें जीवनाचा हा विचार साक्षेपानें केला पाहिजे.

अर्थ असा कीं, **आपण माणसें आहों !** असें म्हणतांना त्यांतील सहानुभूतींचा वा सवलतींचा वांटा केवळ स्वतःकडेच ओढायचा नाहीं. स्वभाववैचित्र्यांत जसा दुसरा आहे तसाच मीहिपण आहें, हें ध्यानांत ध्यावयाचें आणि स्वभाववैचित्र्य केवळ एकोप्याकरितां व परस्परसहकार्याकरितां आहे, हें विसरायचें नाहीं. एवढें झाल्यास--

चिंतक्यास्तव सर्वथा फुकट कां हेका धरावा मग ?
एका शून्य जगीं दिसे तरि दिसे शून्यांत अन्या जग !

अशी तडजोड गडकऱ्यांच्या शब्दांत करण्यास कांहींच हरकत नाहीं.

---

# प्रकरण दुसरें

## १

नित्यपरिचयांतील व अगदीं निकटच्या गोष्टींविषयीं सर्वसाधारण माणसें किती आंधळीं वा अज्ञानी असूं शकतात, हें पाहाण्या-सारखें आहे. तुमच्या बैठकीच्या खोलींत अंगावरील कपडे अडकविण्यास खुंट्या किती आहेत ? राहात्या बंगल्याच्या वरांड्यांत चढून जाण्यास पायऱ्या किती आहेत ?–तुमच्या आळींतील दिव्याचे खांब तुमच्या ओळीला आहेत कीं समोरच्या ? इत्यादि अगदीं साधे प्रश्न कोणालाहि चटकन् विचारावे ! उत्तर देणारा कांहीं क्षण तरी बुचकळ्यांत पडेल आणि नंतर जें उत्तर देईल तें निश्चित व समर्पक असेलच असें नाहीं.

अगदीं समोरच्या गोष्टींत माणूस आंधळा नसूनही आंधळा असतो हेंच खरें. स्वतःचा किंवा इतर माणसांचा स्वभाव–अर्थात् परिचयांतील माणसांचा–माणसाला आकलन होत नाहीं किंवा त्याविषयीं विशेष विचार करावासा वाटत नाहीं, याचें प्रमुख कारण, त्या त्या गोष्टी सरावांतील असतात हेंच. ठेंच लागली म्हणजे खालीं पाहाण्याची इच्छा व्हायची. तोंपर्यंत मार्ग सरळ भासायचा. स्वतःचा किंवा दुसऱ्याचा स्वभाव टोचला पाहिजे मग उद्गार—काय मनुष्य स्वभाव आहे !

सौंदर्य वा चमत्कार प्रतीत होण्यांतहि हाच अनुभव आहे. पुस्तकांत वाचलेलें हिमालयाचें वनश्रीसौंदर्य चाखतां येतें; पण आपल्या गांवाशेजा-रींच असलेल्या एखाद्या सुंदर राईची वा झुळझुळ वाहाणाऱ्या ओढ्याची गंमत वाटत नाहीं. रात्रीचें तारांकित आकाश अत्यंत अद्भुत वाटतें; पण पायाशीं असलेल्या तृणांकुरांच्या जीवनाचें वा सहज दृष्टिपथांत येणाऱ्या गारगोटीचें कौतुक वाटत नाहीं. त्यांच्यांतील सौंदर्यहि प्रतीत होत नाहीं.

अगदीं याच पद्धतीनें मानवी स्वभावांतील सौंदर्य, चमत्कृति वा विविधता माणसाला रिझवूं शकत नाहींत.

सौंदर्य वा चमत्कृति वस्तूंत असते कीं, पाहाणाऱ्याच्या दृष्टींत असते !—हा वादाचा प्रश्न आपण बाजूला ठेवूं. एवढें खरें कीं, सौंदर्याची प्रचीति घ्यावयाची असल्यास सौंदर्ययुक्त वस्तूपासून माणसानें थोडें दूर राहिलें पाहिजे. दुरून आलेल्या गायनाचे सूर मोठे मधूर वाटतात नव्हे !—शेजारच्या घरांतील उदकाडीचा सुवास विशेष मोहक भासतो नव्हे !

सुंदर चित्र पाहण्यांत हा अनुभव रोकडा आहे. तें त्याच्या कर्णा इतकें लांब धरून पाहावें लागतेंच लागतें ! जलरंगाचीं नामांकित चित्रें सौंदर्यभरित केव्हां !—दुरून पाहिलीं तर !—तैलरंगांतील चित्रांची तर गोष्टच बोलावयाला नको. तैलरंगाचें चित्र हातांत घेऊन पाहिलें तर !—समजा, रात्रीच्या वेळीं चार लोक शेकोटी करून शेकत बसले आहेत असा देखावा चित्रांत आहे, तर जवळून काय दिसेल ? एखादी चिरटलेली भिंत कशीतरी लिंपल्यावर जशी ती ओंगळ दिसते, तसें तें दिसेल. चित्रांत काय दर्शविलें आहे, याचा उलगडासुद्धां नीट होणार नाहीं. पण तेंच चित्र भिंतीला लावावें नी दुरून पाहावें. पेटलेली शेकोटी, रसरसलेला विस्तव, त्यांतून उठलेल्या ज्वाला आणि मधेंच कुठेंतरी एवढासा धूर अगदीं स्पष्ट दिसेल ! आणि चित्रकाराची कुंचली यशस्वी असेल तर ? त्या शेकोटीचें सौख्य उपभोगणारे लोक मोठ्या मजेंत गप्पागोष्टी करीत असल्याचाहि भास होईल !—तात्पर्य, सौंदर्यप्रचीति दूरत्वानें विशेष स्पष्ट व यथातथ्य येते यांत शंका नाहीं.

चित्राची गोष्ट आपण बाजूला ठेवूं. तसलें चित्र पाहाण्यास कुठेंतरी प्रदर्शनांत जावें लागेल. आपण ज्या गांवांत वा नगरांत राहातों त्याचें सौंदर्य मुख्य चौकांत राहून दिसेल का ?—नाही. कुठेंतरी उंचस्थानीं दूर

जायला हवें ! एवढी प्रचंड मुंबापुरी ! कोटाच्या भागांत किती वैभवसंपन्न आहे ! पण तिचें सौंदर्य पाहायचें झालें तर ?—मलबारहिलवर गेलें पाहिजे ! मुंबई कांहीं निराळीच भासते.

मुंबईच काय, सामान्य खेडें घ्याना. अगदीं ओढ्याच्या कांठाला व वृक्षराजींत गुरफटलेलें असू दे. त्याची गंमत पाहायची झाल्यास, त्याच्या शेजारीं एखादी टेकडी असावी, तिच्या माथ्यावर जावें नी खालीं दृष्टि टाकावी ! गांवाशेजारचा ओंगळ वाटणारा ओढा एकदम निराळें रूप धारण करतो ! त्याची नागमोडी गति, कांठचीं झाडेंझुडपें, पाणोठा, मधून मधून सूर्यप्रकाशांत चमकणारें पाणी आणि झाडींत लपलेलें गांव जणूं सुंदर चित्रच !—खालीं पसरलेलीं तींच शेतें, त्यांत वावरणारीं तींच माणसें व जनावरें, आणि तीच बागाईत; पण सारें कांहीं मनोवेधक वाटतें ! आपण मोहित होतोंच होतों.

सौंदर्यप्रचीतीचा हाच नियम मानवस्वभावांतील सौंदर्याला म्हणा किंवा यथातथ्य-दर्शनाला म्हणा, लागू आहे ! आपण थोडें दूर सरकून आपल्या भोंवतीं पसरलेल्या मानवस्वभावाचा देखावा पाहाण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

याकरितां मोटा आटापिटा केला पाहिजे अशांतला भाग नाहीं. जिथें चारसहा माणसें जमलीं आहेत, अशा स्थानींहि किंचित् बाजूला राहून मानवस्वभावाची गंमत पाहातां येईल.

किंवा गांवातल्या एखाद्या तिठ्यावर बसून किंवा नगरांतील एखाद्या राजमार्गावर थांबून आपल्या पुढून जाणाऱ्या जनसमूहाचें अवलोकन करतां येईल. या असल्या जनसमूहाकडे पाहून प्रथमतः विशेष कांहीं वाटणार नाहीं. पण ही समोरून जाणारी गर्दी आपण कां पाहातों आहों ? हें ध्यानीं घेऊन निरीक्षण करूं लागल्यावर एक नवा अनुभव जाणवूं लागतो.

## २

बहुश्रुत व चौकस वाचकांना हें माहीत आहे कीं, राजधानी म्हटलेल्या नगरांत त्याचें वैभव दाखविण्याकरितां व लोकशिक्षण वाढावें म्हणून लहानमोठीं पदार्थसंग्रहालयें व प्राणिसंग्रहालयें स्थापन केलेलीं असतात. मुंबईचा राणीचा बाग हें त्याचें मोठें उदाहरण एक वेळ अवलोकन करण्यासारखें आहे.

या असल्या संग्रहालयात सृष्टींतील विविधता, वैचित्र्य व चमत्कृति यांचा जमेल तेवढा सांठा करण्याचा उपक्रम सारखा चाललेला असतो. त्यांत नीट व्यवस्था राहावी म्हणून अनेक दालनें, उपदालनें पाडलेलीं असतात. यांपैकीं कोणतेंहि एक दालन सहज पाहिलें तरी कांहीतरी ज्ञान व त्यांतून निर्माण होणारा आनंद माणसाला लाभल्यावांचून राहात नाहीं. त्यावेळीं एकाच गोष्टीचें स्मरण होत नाहीं. तें माणसाच्या बुद्धिमत्तेचें व परिश्रमाचें होय.

या संग्रहांचें अस्तित्व माणसामुळेंच नव्हे काय ?–आणि त्यांचा आनंद लुटणारा प्राणी म्हणजे एकमात्र माणूसच, नव्हे ?

याच धर्तीचा आणखी एक प्रकार आहे. तो प्रदर्शनांचा होय. शेती, उद्योग, व्यापार, चित्रकला इत्यादि निरनिराळ्या विषयांचीं प्रदर्शनें मधून मधून मोठ्या नगरांतून भरतातच; पण अलीकडे खेड्यांपाड्यांतूनहि जत्रा भरण्याच्या संधीला शेती व ग्रामोद्योगासंबंधीं प्रदर्शनें भरविण्यांत येऊं लागलीं आहेत !—माणुसप्राण्याचा हा खटाटोपहि ध्यानांत घेण्यास हवा. त्यानंतरचें लोकशिक्षणाचें व ज्ञानप्रसाराचें मोठें साधन म्हणजे ग्रंथालयें होत. यांची प्रतिष्ठा स्पष्ट असल्यामुळें विशेष सांगण्याचें कारण नाहीं. ग्रंथालयाच्या कोणत्याहि शाखेंत जावें आणि वरवर दृष्टि टाकावी. माणसाच्या कर्तृत्वाचें कौतुक वाटल्यांवाचून राहाणार नाहीं.

## ३

नदीचे पाणोठे, चावड्या, देवळें, बाजार व तिठ्याचीं स्थानें हीं खेडेगांवांतील माणसें जमण्याचीं ठिकाणें. म्हणून मानवी स्वभावाचा अभ्यास करूं पाहाणाऱ्या जिज्ञासूला या या स्थलांचा हवा तसा उपयोग करतां येईल.

याच दृष्टीनें छोट्यामोठ्या नगरांत मुख्य राजमार्ग, विश्रांतिगृहें सभा व सार्वजनिक उद्यानें, फिरण्यास जाण्याचीं स्थानें, नाटक वा चित्रपट-गृहें हीं मानवसमाज एकत्र येण्याचीं स्थानें होत. यावरून ज्याला माणूस, त्याचा स्वभाव, त्याचें मन, त्याचे आचारविचार यांचा परिचय करून घ्यावयाचा असेल त्याला कुठेंहि व केव्हांहि भरपूर संधि आहे हें काय सांगायला पाहिजे ?

मात्र यासंबंधीं एक गोष्ट लक्षांत घेण्यास हवी. वर सांगितल्याप्रमाणें मानवस्वभावाचे निरनिराळे घटक पाहातांना आपल्या दृष्टींत तरतमभाव पाहिजे. आणि समोर दिसणारा माणसांचा थवा कां जमला आहे, याची स्पष्ट जाणीव स्वतःला हवी. म्हणजे विचार करण्यास सोपें जातें.

वाचनाचा आस्वाद घेण्यासारखें आहे हें. ललितवाङ्मयाची गोष्ट घ्या. काव्य, नाटक, कादंबऱ्या, गोष्टी इत्यादि प्रकारांपैकीं जें पुस्तक आपण उचलूं, त्याचें स्वरूप आपणास कळलेलें असलें म्हणजे आपल्या मनाची चुकभूल होण्याचें कारण राहात नाहीं. आरबी भाषेंतील सुरस गोष्टी वाचतांना आपण अर्वाचीन कादंबरीचें तंत्र त्यांत पहात नाहीं. किंवा गडकऱ्यांची कविता वाचतांना दासबोधाचे नियम लक्षांत घेत नाहीं. खरेंच आहे. लावणीचा चटकदारपणा वा नखरा तुकारामाच्या अभंगांत कसा

आढळणार ?—किंवा अभंगांतील शांति-भक्ति-समाधान लावणींत कोठून असणार ? ज्याची त्याची गोडी व योग्यता वेगवेगळी.

आणखी एक गोष्ट. वाचनाची गोडी लागल्यानंतर आपलें लक्ष प्रथमतः ललितवाङ्मयाकडेच लागतें. कथा-कादंबऱ्याच आपल्यास मनापासून रुचतात. कारण अनायास मनोरंजन हें आपलें ध्येय असतें. ज्ञानकोश वा गीतारहस्य यांसारख्या नामवंत ग्रंथांची योग्यता आपल्यास माहीत असतांहि आपण त्यांच्या वाटेला जात नाहीं. कां ? —त्यांचें वाचन आपल्या बुद्धीला पेलण्यासारखें नसतें म्हणून. वाचनाची गति जसजशी वाढत जाईल, तसतसें आपलें वाचन आपोआपच चौरस होत जातें. मग आपलें चोखंदळ मन कथा-कादंबऱ्यांच्या पलीकडे सहजच धांवूं लागतें.

मानवस्वभावाच्या निरीक्षणाला व परीक्षणाला हाच नियम लागू आहे. पहिल्यापहिल्यांदा त्यांत प्रत्यक्ष मनोरंजन व अप्रत्यक्ष ज्ञानलाभ घडत गेला पाहिजे, तरच त्या विषयाची चटक मनाला लागेल.

४

पदार्थसंग्रहालयें, प्रदर्शनें आणि वाङ्मय हीं ज्ञानार्जनाचीं प्रचंड साधनें मनांत आणावीं आणि मानवसमाजाकडे पाहावें, किंवा, मानवाच्या विविधरंगी समाजाकडे पाहावें; आणि वरील साधनांच्या निर्मितीसंबंधांतील त्याचा व्याप शोधावा. मन थक्क झाल्यावांचून राहाणार नाहीं.

दहापांच माणसांनीं बनलेलें कुटुंब, अशा शेंकडों कुटुंबांनीं बनलेलें गांव आणि अशा हजारों गांवांनगरांनीं बनलेला देश ! मानवसमाजाचीं हीं वर्तुळें कशीं विस्तार पावत गेलीं आहेत ! यांत लहान-मोठे भाग पाडून मानवस्वभावाची गंमत पाहावयाची आहे काय ?—चला राजमार्गावर. जनप्रवाह मागें पुढें हेलकावत चालला आहे. कुठें जोड्या जोड्या

आहेत. कुठें घोळका आहे. कुठें विलक्षण भीड आहे तर कुठें विरळपणा आहे. घाई व संथपणा यांचें मिश्रणहि प्रेक्षणीय आहे. मार्गाच्या कडेला राहून खुशाल हा देखावा पाहावा नी मनाशीं विचार करावा.

याच धर्तीनें एखाद्या देवालयांत जावें नी माणसांची ये-जा पाहावी. वाचनालयांत जावें नी तेथें जमलेल्या समूहाचें करमणुकीच्या दृष्टीनें अवलोकन करावें, किंवा सभागृहीं जाऊन मिसळावें, किंवा नाटक–सिनेमा–गृहांत प्रवेश करून स्वतंत्र प्रेक्षक व्हावें. मानवसमूहाचे हे निरनिराळे गट म्हणजे मानवस्वभावाचा एकेक ग्रंथच. वरवर चाळावा, एखादा भाग पाहावा. किंवा संथपणें मनन करावें. अनेक गंमती ध्यानांत येतील. मनोरंजनाबरोबर कांहीं विशेष ज्ञानहि होईल.

याहिपेक्षां विशाल –विविधता व वैचित्र्य यांनीं भरलेलें– मानवसमाजाचें चित्र पाहावयाचें आहे का ?—मध्यवर्ती असणारें व अनेक फांटे एकत्र आलेलें रेल्वे स्टेशन पाहाण्यास जावें. एका स्थानीं व एका वेळीं कितीतरी गोष्टी पाहाण्यास मिळतील. याविषयीं माझा स्वतःचा एक अनुभव सांगण्यासारखा आहे.

कांहीं निमित्तानें भुसावळला गेलों असतां फावल्यावेळीं गंमत म्हणून स्टेशनवर फिरण्यास गेलों. प्लॅटफॉर्म तिकीट घेऊन आंत घुसलों व इतस्ततः भटकत निघालों. पदार्थसंग्रहालयांत फिरावें त्याप्रमाणें अवलोकन करीत एका पुलावरून चाललों असतां मध्येंच थांबलों व खालीं नजर टाकली. उजव्या हाताला तिकिटघर होतें आणि त्याला लागून विस्तीर्ण प्लॅटफॉर्म पसरला होता. थर्डक्लासची वेटिंगरूमहि हीच असावी.

भुसावळ हें रेल्वेचें एक प्रमुख केंद्र. इकडे मुंबई व तिकडे दिल्ली–कलकत्ता या राजधानींना जोडणारी ती मोठी उतारपेठ असल्यामुळें भिन्न भिन्न भागांतील प्रवाश्यांनीं ती नेहमींच गजबजलेली असते. आजहि

एखादी मोठी जत्रा भरल्याप्रमाणें तें स्थान माणसांनीं फुलून गेलें होतें. कौतुकवश होऊन मी सहजच थांबलों आणि खालचा जनसंमर्द पाहूं लागलों.

मानवस्वभावाचें विशाल चित्र होतें तें.

भुसावळ महाराष्ट्रांत मोडत असल्यामुळें महाराष्ट्रीयांचें व त्यांच्या भाषेचें प्राबल्य तेथें भासत असल्यास नवल नाहीं. पण ही गोष्ट चटकन ध्यानांत न येईल इतका निराळेपणा तेथें स्पष्ट दिसत होता. माझ्या माहितीप्रमाणें ह्या जमावांत मला बंगाली, युक्त प्रांतीय, पंजाबी, सिंधी, मारवाडी, गुजराथी, राजस्थानी, कानडी व मद्रासी इतक्या प्रकारचे लोक आढळले. यांत धर्म, पंथ, आचार-विचार, पोषाख व भाषा यांचें संमिश्रण विलक्षण साधलें होतें, हें सांगण्याचें कारणच नाहीं.

मानवांचा केवढा संकर तेथें जुळून आला होता. अनेक देशांचे अनेक लोक. प्रवासाच्या धांवपळींत सहज एकत्र आलेले. कांहीं कालानें सर्वांची पांगापांग होणार होती. कोणी कोणाचा नव्हता. घडीभराचे सागे सोबती. पण भेदाभेद असा गंमतीचा कीं पाहातांच मन रमावें. स्त्री-पुरुष, म्हातारे-तरुण, मुलें-बाळें, श्रीमंत-गरीब यांची सरमिसळ सर्वत्र दिसत होती. कुठें जोडपीं होतीं, कुठें कुटुंबें होतीं. कुठें नुस्ता पुरुषांचा जमाव होता. कुठें भणंग-भिकारी होते, तर कुठें एखादाच प्रवासी होता. याशिवाय ज्यांना जनमनलज्जा फारशी नाहीं व कायद्याची भीति मुळींच नाहीं असे धटिंगणहि वावरत होते. हा देखावा पाहून कांहीं वेळ तरी मी चकित होत्साता पाहातच राहिलों.

मी स्वतःशीं म्हटलें : मानवसमाजाची विविधता व वैचित्र्य किती उमाप आहे ! वयें, वस्त्र-प्रावरणें, आचार-विचार, हावभाव, रंग-रूप, सगळ्यांत विविधता. मुद्रा व्यक्तिगणिक निराळी. तोच मासला स्वभावाचा. साम्य व विरोध यांची भेसळ अशी कीं मोठी गुंतागुंत वाटावी. बरें केवळ गुंतागुंत

म्हणावी, तर कांहीं धागे स्पष्ट दिसण्यासारखे अलग अलग; आणि या अशा लोकांपैकीं मी एक आहें, नव्हे ?

मग नवे विचार मनांत आले. हा एवढा जनसमाज इथें कां जमला आहे ?—जीवनकलहाच्या गोंधळांत सांपडला म्हणून. शक्य असेल तेवढ्यांच्या मुद्रा न्याहाळीत शोध घेतला तर काय आढळेल ?—जें ठायीं ठायीं दिसतें तेंच. दुःखी कष्टी, आनंदी-उत्साही, चिंतातुर, उगीच हसणारी, उगीच गंभीर, अशाच मुद्रा सर्वत्र दिसतात, नव्हे ? ही झाली बाह्य परिस्थिति. प्रत्येकाचें आंतर कोणत्या रूपांत असेल बरें !—या एकत्र आलेल्या मनुष्यमात्राच्या मनांत कोणकोणते विचार येत असतील, विकार उसळत असतील, भावना हालत असतील, आशा-निराशांचें आंदोलन चालू असेल, काय सांगावें ? अगदीं निर्विचार वा निर्विकार कोणीच असत नाहीं, असणार नाहीं, हें निश्चित; पण आंतील खळबळ कोणत्या धर्तीची असेल हें कळायला कांहीं मार्ग आहे का ?–मुद्रेवरून मनोगत ताडणें केवळ अशक्यच आहे का ?– शोधत गेल्यास कांहीं अंदाज बांधतां येतील; पण निश्चित उत्तर सांपडणें कठिणच. कारण विकार-विचार उठणें हा मनाचा धर्म खरा; पण ते तरंग लपविणें किंवा त्यांना निराळा रंग देऊन प्रगट करणें हें माणसाचें स्वाभाविक नाट्य आहे.

मानवस्वभावाचा विचार वा अभ्यास करितांना ही गोष्ट ध्यानांत घेतलीच पाहिजे. केवळ मुद्रेवरून मनोगताची अटकळ बांधणें कांहीं वेळां बरोबर वाटलें तरी बाकी तें चुकीचें असण्याचा संभव फार. समोरची व्यक्ति अनोळखी असल्यास आपली अटकळ भलतीकडेच वाहील. पण ओळखीची असेल तरी फसगत होईल. दुसऱ्याविषयीं विचार करितांना त्या व्यक्तीविषयीं आपल्या मनाची अनुकूलता वा प्रतिकूलता आड येईलच. व्यक्ति लोभांतील असल्यास तिच्यावर आपण अवास्तव गुणारोप करूं; नसल्यास भलते आरोप करूं. नित्याचा अनुभव आहे हा. म्हणून आपण

सारींच माणसें आह्मीं हा मुख्य मुद्दा गृहीत धरून मानवस्वभावाचा विचार केला पाहिजे.

असेच कांहीं विचार करीत मी प्लॅटफॉर्मवरील मानवसमाजाचें तें बकाल भासणारें चित्र पुन्हां एका निराळ्या दृष्टीनें पाहिलें. कांहीं वेळानें मनाला हें पटलें कीं, माणूस चांगला आहे व वाईटहि. तो आचारा-विचारानें दानव असतो व देवहि. प्रकाश व अंधार यांच्या जोडीप्रमाणें हा प्रकार आहे. वनश्रीचें सौंदर्य त्यांत असणाऱ्या छाया-प्रकाशाच्या वांटणीमुळें आकर्षक असतें. मानवसमाजाचें कोठलेंहि चित्र असेंच सुंदर असतें. धीरोदात्त व हीन यांचें संमिश्रण असायचेंच त्यांत.

समोरच्या जनसमुदायांत मला तेंच आढळलें. नानाप्रकारच्या भिन्न-त्वांमुळें सारे प्रवासी आपल्यापुरते स्वतंत्र असले तरी त्या सर्वांमध्यें साध्या माणुसकीचा दोरा ओवलेला होता. म्हणूनच त्या देखाव्यांत मला कथा, काव्य, नाट्य व संगीत यांची रम्यता आढळून आली.

---

## प्रकरण तिसरें

### १

माणूस ! व त्याचें सृष्टिविषयक प्रचंड ज्ञान ! आश्चर्यानें मन तटस्थ होतें, भांबावून जातें. सृष्टिरचनेंत भरलेल्या नानाविध रहस्यांच्या गांठी उकलतां उकलतां मनुष्याच्या कुशाग्रबुद्धीनें काय बाकी ठेविली आहे ! अनेक शास्त्रांची रचना, विद्याकलादिकांची उपासना, आणि उद्योगाचे व्याप असे कांहीं विशाल आहेत कीं, सारें कांहीं अनंत व अपार वाटावें. आणि तरी ज्ञात्यांनीं व शास्त्रज्ञांनीं म्हणावें कीं, गवसलेला ठेवा अत्यल्प आहे !–कणमात्र सांपडलें असेल नसेल.

कांहीं असो. माणसाची आकलनशक्ति दांडगी खरीच! आदि-मानवानें स्वसंरक्षणार्थ सोटा हातांत घेतला तो दिवस आणि आजच्या महायुद्धांतील भयंकर शस्त्रास्त्रें—ही सांखळी काय दर्शविते ?—गोफणींत घालण्याकरितां उचललेला एवढासा धोंडा. त्यानंतर त्याची परिणती काय तर आजचें भूस्तरशास्त्र! खाण्याकरितां झाडपाला ओरबडण्यास केलेला प्रारंभ आज वैद्यक, कृषि व वनस्पतिशास्त्र इतक्या रूपांनीं विस्तार पावला आहे! पहिल्या माणसानें रात्रीं केवळ कौतुकानें, भीतीनें वा आश्चर्यानें आकाशाकडे पाहिलें. आज त्याच्या वंशजांनीं, खगोलशास्त्र, वायुशास्त्र, विद्युत्शास्त्र इत्यादि आश्चर्यकारक शास्त्रांना स्थापित केलें आहे. तात्पर्य, माणसानें सृष्टींत ज्या ज्या लहानमोठ्या गोष्टी पाहिल्या व उपयोगांत आणून उपभोगिल्या, त्या त्या सर्वांचीं त्यानें शास्त्रें रचून टाकलीं! हें त्याचें ज्ञान एवढें सर्वांगी व सर्वव्यापी आहे कीं, त्याच्या दृष्टिपथांत न आलेलें गूढ आतां शिल्लकच राहिलें नाहीं असें खुशाल म्हणावें.

हें जर खरें तर माणसाला स्वतःसंबंधीं नीट उलगडा पडला नाहीं, त्याचें एतद्विषयक ज्ञान तुटपुंजें आहे असें तरी कसें म्हणायचें ? त्यानें आपल्या सोयीप्रमाणें निर्माण केलेले निरनिराळे धर्म व पंथ, त्यांतून निर्माण झालेलें तत्त्वज्ञान व अध्यात्म; त्याची समाजसंघटना व तिच्या स्थैर्याकरितां निर्माण झालेलें राज्यशास्त्र व समाजशास्त्र आणि चालू कालांत फार पुढारलेलें मानसशास्त्र यांच्याकडे पाहिल्यावर काय निष्कर्ष काढावयाचा ?—माणूस स्वतःविषयीं खरेंच अज्ञानी आहे ?—मुळींच नाहीं. वरील शास्त्रें ओरडून सांगतील कीं, नाहीं; मनुष्य स्वतःविषयीं अज्ञानी नाहीं. उलट तो त्या विषयांतहि पारंगत आहे. माणसानें स्वतःविषयीं, स्वतःच्या स्वभावाविषयीं व मनाविषयीं खूपच खूप विचार केलेला असून त्यानें या विषयांचींहि शास्त्रें—उपशास्त्रें निर्माण केलेलीं आहेत!

आणि या प्रबंधाच्या आरंभालाच आपण विधान करून ठेविलें

आहे कीं, माणूस स्वतःला नीट ओळखीत नाहीं, हा मोठा चमत्कार होय. अगदीं परस्परविरोधी विधानें आहेत, नव्हे?—खरी गोष्ट. पण वाचकांनीं गोंधळांत पडण्याचें कारण नाहीं. पहिलें विधान साधार आहे व आतांचें तितकेंच खरें आहे. वादविवादाचे पुष्कळ विषय असे आहेत कीं, ज्यांना परस्परविरोधी असे पूर्व नी उत्तरपक्ष असतात. पण शेवटीं त्यांचा सांधा जुळलेला असतो. वर्तुळाच्या शेवटाप्रमाणें आहे. वर्तुळाच्या प्रारंभीं जें टोंक असतें, तेंच विरुद्ध दिशेनें प्रगट होऊन पुन्हां पूर्वस्थलीं येतें. पृथ्वी-प्रदक्षिणेची गंमत अशीच नाहीं का? दोन प्रवासी अगदीं विरुद्ध दिशा धरून प्रवासाला निघतात. एक पूर्वेकडे तोंड करून तर दुसरा पश्चिमेकडे तोंड करून, पण दोघांची भेट होते त्यावेळीं दोघेहि एकमेकांस सामोरे आलेले असतात! मानवस्वभावाच्या ज्ञानाज्ञानाची विसंगति या धर्तीची आहे. प्रथम ती विरोधी आहे, मागून ती जुळणारी आहे.

म्हणून आतां आपण दुसऱ्या विधानाकडे वळूं.

कोणत्याहि विषयाच्या ज्ञानाचा प्रारंभ कसा आहे?--प्रथम भयानें वा कौतुकानें त्याकडे पाहाणें, नंतर त्याचा उपयोग हेरणें नी मग त्याचा उपभोग घेण्यास प्रवृत्त होणें. अगदीं याच पद्धतीनें माणसानें स्वतःविषयीं व स्वतःसदृश दिसणाऱ्या प्राण्यांविषयीं विचार केला असला पाहिजे.

अनंत अशा प्राचीन काळीं दोन अगदीं अपरिचित अशा माणसांची प्रथमभेट म्हणजे उभयपक्षीं विलक्षण प्रसंगच. पण याचा विचार करण्या-पूर्वी दुसरे कांहीं प्रश्न मनांत येतात. तिकडे थोडें लक्ष दिलें पाहिजे.

विचार करूं लागल्यावर मनांत येतें: सृष्टींत मनुष्य प्राणी केव्हां अवतरला? प्रथम तो एकला एकच जन्मास आला कीं, स्त्रीपुरुषाची जोडी निर्माण झाली? अशी जोडी प्रथम एकच होती कीं, जोड्या अनेक उद्भवल्या? मानवांतील अगदीं पहिलें जोडपें कसें भेटलें असेल व एक-मेकांकडे आकर्षित झालें असेल?—त्यांतून स्त्रीचें गरोदरपण व त्यानंतर

अपत्यप्राप्ती या गोष्टी कशा समजून घेतल्या असतील?—असे एक ना दोन, अनेक प्रश्न सुचतात. पण यांचीं निश्चित उत्तरें प्रचंड कालोदरांत अशीं दडलेलीं आहेत कीं, त्यांचें दर्शन प्रायः अशक्य कोटींतील आहे!

एवढें मानतां येईल कीं, प्रथम एक जोडपें. त्यांचीं दोघांचीं दोन मातृपितृगृहें, पुन्हा त्यांचीं त्यांचीं कुटुंबें अशी समाजरचना होत गेली व वंशविस्तारानें मानव पसरत चालला! प्रारंभीं दिलेल्या चित्रांत हीच गोष्ट स्पष्ट केलेली आहे. वर वंशविस्तार आणि खालीं आधार समाजरचनेचा.

## २

पहिल्यावहिल्या मानवकुलासंबंधीं भिन्न भिन्न दंतकथा भिन्न भिन्न देशांत प्रचलित आहेत. ख्रिस्ती पुराणांतील आदाम-इव्हची अद्‌भुतरम्य कथा सर्वश्रुतच आहे. ग्रीक पुराणांतहि स्त्रीपुरुष यांचे देह संयुक्त असून तो विचित्र प्राणी मजेंत राहात असल्याचें वर्णन आहे. पुढें या प्राण्यानें देवास त्रास दिला. तेव्हां देवानें रागावून त्याचीं बरोबर दोन शकलें केलीं! एक स्त्रीचें नी दुसरें पुरुषाचें.

आपल्याकडे प्रचलित असलेलें अर्धनारीनटेश्वराचें चित्र, किंवा पुरुषाच्या देहापासूनच स्त्रीची उत्पत्ति झाली ही कल्पना, वरील कथेचे पर्याय होत. जीवशास्त्राचा याला थोडासा आधार आहे. उत्क्रांति तत्त्वाप्रमाणें माणसाची परिणती लहान जंतूपासून झाल्याचें मानण्यांत येतें. शास्त्रज्ञांना असा एक जन्तु आढळला आहे कीं, तो वयांत येतांच दुभंगतो. आणि नंतर उभयलिंगी बनून विस्तार पावतो.

यावरून घ्यायचें काय कीं, स्त्री व पुरुष एकल्या स्थितींत पूर्ण नाहींत. त्यांचें परस्परआकर्षण म्हणजे मुळांत तीं एकच होतीं. सृष्टिक्रम नीट चालावा व वंशविस्तार होत राहावा म्हणून लिंगभेदाची योजना. द्विदल धान्याप्रमाणें माणूस उभयविध आहे म्हणून बहुविध होऊं

शकतो, एवढें गृहीत धरण्यास कसलाच बाधा नाहीं. प्रत्यक्ष अनुभवच तसा आहे.

हें जर खरें तर माणसानें स्वतःच्या अभ्यासाचा आरंभ लिंगभेद जाणल्यापासून केला असें मानण्यास वा म्हणण्यास काय हरकत आहे ?— पुढें याच जोडप्यानें परस्परांच्या देहरचनेंतील साम्य व विरोध वरचेवर अवलोकून किंवा पाण्यांत पडलेलीं आपलीं प्रतिबिंबें पाहून विशेष विचार केला असेल आणि कांहीं कल्पना निश्चित ठरविल्या असतील, नाहीं का ?

तरुण स्त्रीपुरुषांची परस्पर—आकर्षणांतून निर्माण झालेली अगदीं पहिली भेट म्हणजे जीवनांतील केवढी अद्‌भुतरम्य घटना, नव्हे ? आदि-मानव जोडप्याला किती विलक्षण वाटलें असेल त्यावेळीं ! उपजत आकर्षण व तिखट घ्राणेंद्रियाच्या उपयोगानें होणारें ज्ञान यामुळें तें जोडपें एक-मेकांकडे ओढलें गेलें असलें तरी त्यावेळीं उभयपक्षीं भय, लज्जा, संशय, कौतुक व मीलनोत्सुकता यांचा संघर्ष घडला असलाच पाहिजे. आणि यांतून परस्पराला परस्पराच्या स्वभावाची जाणीव होत गेली असली पाहिजे. कारण त्याचेंच प्रत्यंतर चालू घडीच्या जोडप्यालाहि येतें. असो.

## ३

सृष्टिरचनेंत सूक्ष्मांतून विशालत्वाकडे जाण्याचा क्रम दिसतो. बिंदूतून सिंधु, कणांतून पर्वत आणि लवमात्र बीजांतून मोठा वृक्ष हीं त्याचीं सहज कळण्यासारखीं उदाहरणें. मात्र असा कांहीं क्रम आहे हें विचार केल्यावांचून माणसाच्या लक्षांत येत नाहीं. वडाच्या छायेला बसलेल्यांपैकीं किती जणांना वटबीजाच्या तुच्छतेची कल्पना असेल ? पर्वत हा असंख्य कणांचा समूह आहे, ही गोष्ट शास्त्रज्ञांच्याच परिचयाची. सागराजवळचीं गंगेचीं मुखें पाहाणाऱ्याला तिचें मूळ कुठेंतरी हिमगिरीच्या पोटांत आहे, हें कसें कळणार ? तो पाहणार फक्त मुखाजवळचा विशाल प्रवाह.

प्रवालद्वीपाची रचना तर याहिपेक्षां अद्भुत आहे. माणसांनीं वस्ती करून नादण्यासारखीं कितीतरी बेटें निरनिराळ्या सागरांत आहेत. हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्याला असलेलीं लखदीव-मालदीव बेटें याच जातीचीं आहेत. हजारों माणसांनीं वस्ती करून राहण्यासारखा हा भूभाग समुद्राच्या पोटांतून वर आणिला, सूक्ष्म अशा प्रवालकीटकांनीं ! त्यांचें हें कार्य लक्षावधि वर्षें अविरत सुरू होतें. यावरून सूक्ष्माची शक्ति केवढी प्रचंड आहे व कालगति केवढा चमत्कार घडवून आणितें हें लक्षांत घेण्यासारखें आहे.

मानवजातीच्या आजच्या प्रपंचाला वरील नियमच लागू आहे. प्रारंभ न कळण्यासारखा. आजचा विस्तार आकलन न करण्यासारखा. पृथ्वीची लोकसंख्या आजमितीला दोनशें कोटींच्या आसपास आहे. आणि ती सर्वत्र पसरलेली आहे. सृष्टीमध्यें अहर्निश चाललेल्या जीवनमरणाच्या झगड्यांत अत्यंत चिवटपणानें जगूं पाहाणारा जीव म्हणजे माणूसच. पशु-पक्षी, कीटक, जीवजन्तु इत्यादि मानवेतर प्राणी सगळीकडे असतांहि, आपलें अस्तित्व अबाधित राखणारा माणसावांचून अन्य प्राणी नाहीं. आज ज्यांच्या हाडांचे सापळे सांपडतात, असे किती तरी अजस्रकाय जीव जीवनकलहांत नामशेष झाल्याचें आढळून येतें. पण धन्य या एवढ्याशा द्विपादाची ! संरक्षणाची वा जीवनधारणेची सामुग्री त्याच्याजवळ अत्यल्प असतां किंवा नसतांहि तो जगला आहे, वाढला आहे, व जगाचा स्वामी झाला आहे ! मानवजातीच्या अस्तित्वाचा लाखों वर्षांचा काल ध्यानीं घ्यावा व विचार करावा.

सृष्टीनें मानवजातीचा सांभाळ केल्याचें दिसतच नाहीं. उलट साऱ्या घडामोडी जगूं माणसाला नाहींसा करण्याच्या उद्देशानें झालेल्या ! हिम-प्रलयाचे अनर्थ, ज्वालामुखीचे आग ओकणारे स्फोट, भूकंपाचे प्रचंड व विदारक धक्के, संहाराकरितांच निर्माण झालेलीं युद्धें, महायुद्धें, अल्पावधींत

लाखांलाखांनीं बळी घेणाऱ्या सांथी, उलथापालथ करणाऱ्या राज्यक्रांत्या, आणि दीर्घ अवर्षणांनीं देशच्या देश उध्वस्त करणारे दुष्काळ, इत्यादि महान् आपत्ति काय सांगतात? पृथ्वीवरून मानवजातीला पुसून टाकण्याचाच त्यांचा हेतु नाहीं का दिसत?—पण त्याच दृष्टीनें मानवाचा प्रसार व विकास पाहा! निःसंशय धन्यता वाटेल.

भूगोलाचा नकाशा पुढें धरा आणि कुठेंहि दृष्टि टाका. माणसाची वस्ती नाहीं, असा भूभाग आढळणार नाहीं. हिमवर्षावानें सदा गोठलेल्या उत्तरध्रुवाकडे मनुष्य नांदतो आहे, तसा तो सहारा वाळवंटासारख्या निर्जल प्रदेशातहि वास करून आहे. आफ्रिकेच्या हिंस्र पशुमय देशांत तो आहे तर सदा भूकंप होणाऱ्या जपानादि भागांत तो आहे. ज्वालामुखीच्या कुशींत तो बेधाशक वाढतो तर ऑस्ट्रेलियासारख्या ओसाड भागांतहि दिसतो. तात्पर्य, भूगोलाच्या अष्ट दिशा त्यानें व्यापिल्या असून त्याच्या वाढीला क्षेत्रच अपुरें पडूं लागल्याचें दिसूं लागलें आहे. चमत्कारच नव्हे का हा? आणि याचें मूळ कशांत?—माणसाच्या मनांत, बुद्धींत कीं स्वभावांत? कशांतहि माना. माणूस प्राणी अजब खरा.

या स्थानीं मानवजातीचें मूल जन्मस्थान कोणतें व त्याचा प्रसार कसकसा होत गेला असावा, असा एक प्रश्न मनांत आल्यावांचून राहात नाहीं. पण याचें उत्तरहि अनिर्णित आहे. एवढें खरें कीं, दोनशें कोटी लोकसंख्येनें सर्वत्र पसरलेली मानवजात एका वंशाची वा एका वर्णाची नाहीं. युरोप-हिंदुस्थानांतील आर्यवंशाचे गोरे लोक, आफ्रिकेंतील कृष्णवर्णी, अमेरिकेंतील आदिवासी ताम्रवर्णी, चीन-जपानकडचे मंगोलियन वंशाचे पीतवर्णी आणि प्रशांत सागरांतील द्वीपसमूहांतून आढळणारे गनटी लोक या सर्वांचा परस्परांशीं कसलाच संबंध दिसत नाहीं. म्हणजे या पांचहि वंशांत परस्पर वर्णसंकर झालेला नाहीं, असें मात्र नाहीं. पोटापाठीमागें लागलेला व सोय असेल तेथें पाय रोवणारा माणूस रोटी व बेटी मिळवतांना

सुक्तासुक्ताच्या फारसा विचार करीतच नाहीं. तरीपण वर सांगितलेले वंश व वर्ण भिन्न भिन्न आहेत यांत शंका नाहीं. मग भाषा, आचार-विचार, आहार-विहार, ज्ञान इत्यादि गोष्टींतहि भिन्नत्व असणार हें उघडच आहे.

मानवस्वभावासंबंधीं विचार करितांना ही सारी वस्तुस्थिति पार्श्व-भूमि म्हणून ध्यानांत ठेवणें आवश्यक आहे.

मनुष्यदेहाची रचना, त्याला असलेलीं दशेंद्रियें आणि त्याचें मन या गोष्टी ध्यानांत आणून भूतलावरील कोणत्याहि मानवसमूहाकडे पाहिलें तरी असें दिसतें कीं, सामान्यतः सर्व माणसें सारखींच आहेत. तरीपण विसाव्या शतकांत खरी मात केली आहे युरोप अमेरिकेंतील गोऱ्या लोकांनीं. चोवीस हजार मैल परिघाचा भूगोल त्यांनीं आपसांत वांटून घेतला असून शास्त्रीय ज्ञानबलानें ते एवढे शिरजोर झालेले आहेत कीं, त्यांच्या व्यतिरिक्त असलेल्या मानवसमाजाचे ललाटलेख आम्ही लिहूं त्या पद्धतीचेच असले पाहिजेत असा त्यांचा अट्टाहास आहे. हिंदुस्थानां-तील चाळीस कोटी प्रजा आर्य वंशाचीच आहे; पण तिचें परदास्य असें भयंकर कीं, आफ्रिकेंतील नग्नावस्थेंत हिंडणारा कृष्णवर्णी व हिंदुस्थानची परतंत्र प्रजा एका दावणींत आहे म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं ! सुवर्णभूमि–भारताची प्रजा केवळ अन्नापायीं मातीमोल व्हावी, हा दुर्दैवाचा मोठा विलास होय !–गौरवर्णीयांना अस्मान ठेंगणें असावें तर हिंदवासी-यांना आभाळ फाटलेलें असावें !

या विपरीत अवस्थेचें कारण काय ?—जें सामान्य माणसांत आढळतें, तेंच राष्ट्रांत आढळतें, असें याचें उत्तर आहे. आपल्या भोंव-तालच्या माणसांत कोणी श्रीमंत तर कोणी दरिद्री, कोणी ज्ञानी तर कोणी अडाणी, कोणी तापट तर कोणी शेळपट, कोणी प्रेमळ तर कोणी दुष्ट इत्यादि प्रकार आढळतात. या फरकाचें कारण काय ?—सर्वांची देहरचना सारखी, इंद्रियें सारखीं, मन सारखें, मग फरक कां ?—**स्वभाव** !

सृष्टीमध्यें चालू असलेल्या चक्रनेमिक्रमांतून मानवजात सुटलेली नाहीं. जो मानवसमाज उन्नत असेल तो अवनत व्हावयाचा व जो अवनत असेल तो उन्नत व्हायचा हें ठरल्यासारखें असलें तरी चक्रनेमिक्रमाची गति वाढणें, कमी होणें किंवा उलट होणें ही गोष्ट माणसाच्या कर्तृत्वावर अवलंबून आहे, आणि त्याचें कर्तृत्व त्याच्या स्वभावविशेषाशीं निगडित आहे यांत शंका नाहीं.

मानवस्वभावाचा अभ्यास याकरितां करावयाचा.

आपण आहों माणसें ह्या उद्गारांत अहंकार आहे व निराशाहि. पण अहंकार कां धरायचा किंवा निराश कां व्हायचें नाहीं, याचा विचार करावयाचा झाल्यास आपण आपल्या स्वभावाकडे व एकंदर मानव-समाजाकडे थोडें साक्षेपानें पाहिलें पाहिजे.

४

कोणत्याहि विषयाचें सामान्य ज्ञान घ्यावयाचें असलें तरी त्यात कांहीं भाग पाडून, ठोकळ क्रम आंखणें आवश्यक असतें. मग त्याचा अभ्यास करावयाचा झाल्यास आणखी दक्षता घेतली पाहिजे यात शंकाच नाहीं. सृष्टीचें ज्ञान मिळवितांना चौकस माणसानें प्रथमतः हाच मार्ग धरला. मग कालांतरानें त्या त्या विषयांचें शास्त्र बनत गेलें.

बागेंत हिंडतांना थोडी शोधक बुद्धि वापरली तरी जाई, जुई, मोगरा, चमेली, या एका जातीच्या वेली आहेत, असें आपल्या ध्यानीं चटकन् येतें. शोधक माणसांनीं अशाच धर्तीनें सभोंवतीं पाहिलें आणि तृणधान्यें म्हणजे अमुक, सस्तन प्राणी म्हणजे अमुक असें वर्गीकरण केलें. पुढें यांतूनच वनस्पतिशास्त्र, प्राणिशास्त्र यांची निर्मिति झाली. अशा स्थितींत माणसानें स्वतःकडे पाहात पाहात स्वतःसंबंधींहि अभ्यास केला असेल हें काय सांगायला पाहिजे ?

भूतलावर दोनशें कोटी माणसें आहेत. व्यक्ति तितक्या प्रकृति ही म्हण खरी धरल्यास व एका माणसांत तीन व्यक्ति सामावलेल्या असतात असें मानल्यास, मनुष्यस्वभावाचे ६०००००००००० ( सहा अब्ज ) नमुने पृथ्वीच्या पाठीवर नांदत आहेत, असें मानण्यावांचून गत्यंतर नाहीं !

सहा अब्ज माणसें नी तितके त्यांचे स्वभाव !—एवढ्या अवाढव्य गणनेंतून निर्णायक असें कांहीं ज्ञान शोधायचें ?—कसें शक्य आहे ? वंश, वर्ण, भाषा यांच्या भिन्नत्वाचा गोंधळ आहेच पुन्हां ! सहारा वाळवंटांतील वालुकाकण मोजीत बसण्यासारखेंच नाहीं का ?—खरी गोष्ट ! माणसाला स्वत:संबंधीं नीटसा बोध झाला नाहीं, त्यानें स्वत:लाच नीट ओळखलें नाहीं, याला कारण हें गौडबंगालच असेल का ?—पण नाहीं, माणूस तसा याहि बाबतींत गप्प बसलेला नाहीं. त्याची कुशाग्रबुद्धि, आकलनशक्ति व ठोकताळे बसविण्याची कल्पकता—या साधनांनीं त्यानें अत्यंत कठिण अशा विषयांचा ठाव घेतलेला आहे. मग तो स्वत:लाच कां वगळील ?—खगोलाकडे पाहातां पाहातां त्यानें जसा भूगोलाचाहि अभ्यास केला, तसाच इतर प्राणिमात्रांविषयीं विचार करतांना स्वत: कोण व कसे याचाहि विचार केला.

माणसानें स्वत:विषयीं ज्ञान मिळविण्यास केव्हांपासून व कसा प्रारंभ केला, हें जरी नक्की सांगतां येत नाहीं, तरी दुसरें मनुष्य म्हणजे स्त्री हिची भेट होतांच त्याच्या मनांत नवी हालचाल सुरू झाली असावी.

ही तरुणी मला कां हवीशी वाटते ? हिच्या संगतीपासून आनंद कां होतो ? तिचा वियोग होतांच चैन कां पडत नाहीं ?—असे कांहीं प्रश्न त्याच्या मनांत प्रथम उभे राहिले असावे. पुढें याच प्रश्नांचीं उत्तरें शोधीत असतां, त्याला दिसून आलें कीं, आपल्या मैत्रिणीला आपल्या संगतिबद्दल असेंच वाटतें. आणि मग त्यास आढळलें कीं, आपल्या भोंवतालच्या साऱ्याच स्त्रीपुरुषांना परस्परसंबंधांत असेंच वाटतें.

मग काय ?—विचारांतून विचार आणि त्यांतून निश्चित उत्तर. माणसानें ठरवून टाकलें कीं, प्रत्येक माणसाला स्त्रीपुरुषविषयक विलक्षण, अगदीं दुर्दमनीय अशी—आसक्ति असते.

या आसक्तीचें नांव—काम !

या कामांतून क्रोधाची उत्पत्ति असते, नव्हे ?—होय. आपल्या मैत्रिणीला दुसऱ्यानें नेलें तर ?—क्रोध !

यावरून अनुमान बांधतां बांधता मनुष्यमात्राला षड्विकार आहेत, असा निर्णय निघाला. मानवस्वभावाचा व मानसशास्त्राचा प्रारंभ हा असा आहे.

---

## प्रकरण चवथें

### १

अष्टादशपुराणानि धर्मशास्त्राणि सर्वशः ।
वेदाः साङ्गास्तथैकत्र भारतं चैकतं स्थितम् ॥

या सुभाषितांत महाभारताची थोरवी अशी गायिली आहे कीं, " अठरा पुराणें, सारीं धर्मशास्त्रें व सांग वेद हे एका बाजूला व एकटें महाभारत एका बाजूला " अशी तुलना केली तर महाभारतच श्रेष्ठ ठरेल.

यावरून आमचा हा महान् राष्ट्रीय ग्रन्थ काय योग्यतेचा आहे हें सहज कळण्यासारखें आहे. लोकव्यवहार, राजनीति, तत्त्वज्ञान नी सनातन धर्म यांच्याविषयीं केलेला सर्वांगपरिपूर्ण विचार अन्यत्र आढळणें खरेंच अशक्य वाटतें. आतां वरील चार विषय–लोकव्यवहारादि–म्हणजे मानवस्वभाव व मानसशास्त्र यांचेंच सविस्तर व समर्पक विवेचन नव्हे काय ?

स्पष्टतेकरितां पुढचें सुभाषित पाहा. वैशंपायन ऋषी भारतांतील कथा जनमेजय राजाला ऐकवीत असतां म्हणतात—

धर्मे चार्थे च कामे च मोक्षे च भरतर्षभ ।
यदिहास्ति तदन्यत्र यन्नेहास्ति न तत् क्वचित् ॥

अर्थ असा, "राजा, धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष या चार पुरुषार्थांविषयीं यांत ( भारतांत ) जें सांगितलें तेंच इतर ग्रन्थांत आहे. जें यांत नाहीं तें कुठेंच नाहीं."

ही प्रौढी वायफळ नव्हे. कौरवपांडवांची भाऊबंदकी लक्षांत घ्यावी आणि महाभारताचें कोणतेंहि प्रकरण सहज चाळावें. बुद्धिमंतालाहि प्रसन्नता लाभेल अशा विचारांचा सुवास सर्वत्र दरवळलेला. भारतकथेंतील प्रमुख व्यक्ति म्हणजे दुर्योधन, दुःशासन, कर्ण, धृतराष्ट्र, गांधारी, भीष्मपितामह, द्रोणाचार्य, विदुर, धर्म, भीम, अर्जुन, कुंति, द्रौपदी, आणि सर्वांचा मुकुटमणी श्रीकृष्ण. यापैकीं कोणत्याहि व्यक्तीचें चरित्र पाहा. प्रत्येक आपल्यापरी वेगळे व ठसठशीत. पण भारतकार व्यासांनीं त्यांचीं रेखाचित्रें अंकित करितांना केवढें कमालीचें बुद्धिचातुर्य दाखविलें आहे! मानव-स्वभावाचा एकेक नमुना पाहावा, अभ्यास करावा, दंग व्हावें.

आणि या महान् ग्रंथाचा गाभा—जगद्वंद्य भगवद्गीता! भारतां-तील मुख्य कथेकरितां गीता आहे, कीं, गीता समजावून देण्याकरितां भारतकथा आहे?—खरें उत्तर व्यासच जाणोत. एवढें खरें कीं, हा अन्योन्यसंबंध अतीव मनोहर आहे! गीतेची महत्तमता वर्णून सांगण्याचें कारणच नाहीं. आज हजारों वर्षें तिनें तत्वज्ञानी जगाला मोहित केलें असून, चालू घटकेलाहि ती तितकीच जगमान्य आहे, ही गोष्ट सर्वश्रुत आहे. आपल्याला पाहावयाचें आहे मानवस्वभाववर्णनाच्या दृष्टीनें. या-विषयींहि गीतेनें मात केली आहे असें अभिमानानें म्हणतां येईल. मुख्य

प्रतिपादन तत्त्वज्ञान व अध्यात्म यांविषयीं पण त्यांच्या अनुषंगानें मानवी स्वभावाचे ठळक पैलू दाखवीत जें मानसशास्त्र प्रगट केलें आहे तें अपूर्व आहे यांत शंकाच नाहीं.

मी कमलीच अतिशयोक्ति करीत नाहीं. मानसशास्त्र हा शब्द अलीकडचा असून इंग्रजी वाङ्मयांतूनच तो आपल्याकडे आला आहे व या विषयाची आपली नवी ओळखहि परस्थच आहे. तरीपण आज युरोप-अमेरिकेंत ज्या मानसशास्त्राचा बोलबाला चालू आहे, त्याचें सम्यक् स्वरूप गीतेंत स्पष्टपणें पाहाण्यास सांपडतें ! किंबहुना गीतेंतील मानसशास्त्र विशेष प्रौढ व यथातथ्य वाटतें. अर्थ व काम यावर पाश्चिमात्य मानसशास्त्राचा मुख्य भर आहे. पण मानवी जीवनांत ते प्रमुख पुरुषार्थ आहेत, ही उच्च कल्पना आमची असून, त्यांना धर्माची जोड असली तरच ते प्रभावी असतात व माणसाला सुख देऊं शकतात हेंहि भारतकार व्यासांनीं उदाहरणें देऊन दाखविलें आहे. या विचारसरणींत पूर्वजांची प्रौढी गात पाश्चिमात्यांना तुच्छ लेखण्याचा हेतु नाहीं. वाचकांचें वस्तुस्थितीकडे लक्ष जावें, ही इच्छा.

## २

युरोप–अमेरिकेंत प्रतिष्ठित होत चाललेलें मानवस्वभावदर्शन आणि त्याचेंच प्रतिबिंब दाखविणारें मानसशास्त्र ही केवळ आजची घटना आहे, असें नाहीं. मानवसमाज प्रगत होत चालला कीं, त्याचें वाङ्मय तयार होऊं लागतें आणि सर्वांआधीं कथा, कादंबऱ्या, नाटकें, काव्यें इत्यादि ललित साहित्यच मोठ्या प्रमाणांत निर्माण होतें, हा सिद्धान्तच आहे. याच्याच जोडीला राष्ट्राची सामाजिक, आर्थिक व राजकीय अशी जी घडामोड चाललेली असते, ती इतिहासरूपानें प्रगट होते. अर्थात् राष्ट्राचें

ललितवाङ्मय काय किंवा इतिहास काय मानवी जीवनच विविध प्रकारें दर्शवितें; आणि असलें हें मानवी जीवन इतकें सर्वव्यापी असतें कीं, त्याचें प्रत्यंतर कुठेंहि आढळावें. इंग्लंडचा प्रख्यात नाटककार शेक्सपीयर किंवा जर्मनीचा महाकवि गटे हे जगन्मान्य कां वाटतात ? त्यांचें वाङ्मय कोठल्याहि मानवी जीवनाचें प्रतीक असतें म्हणून. तात्पर्य पाश्चिमात्यांचें आजचें मानसशास्त्र नव्यानेंच अस्तित्वांत आलें असें नाहीं. परंपरेनें तें तयार होत आलें आहे. इतर अनेक शास्त्रांप्रमाणें त्यालाहि एक विशेष पूर्वपीठिका आहे.

युरोप-अमेरिकेंतील पुढारलेल्या राष्ट्रांचा गेल्या दोन शतकांचा इतिहास पाहावा. त्या राष्ट्रांतहि आपल्या इकडल्याप्रमाणें शेती व वाणिज्य हेच अर्थोपार्जनाचे मुख्य मार्ग होत. तेव्हां त्यांला धरून राजसत्ता, कुटुंब-रचना व समाजधारणा चालू होती; पण पुढें कांहीं योगायोगानें त्या राष्ट्रांत नवी जागृति झाली व त्यांना नवी दृष्टि लाभली. आणि याच्याच जोडीला शास्त्रीय शोधांचा व यांत्रिक कल्पकतेचा परीस त्यांच्या हातीं लागला ! त्याबरोबर यक्षिणीनें कांडी फिरवून नव्हत्याचें होतें केल्याप्रमाणें चमत्कार झाला ! सबंध भूगोल त्यांनीं वाटून घेतला ! साम्राज्यें स्थापन केलीं आणि दूरदेशीं जाऊन वसाहती स्थापिल्या. मातीमोलानें मिळणाऱ्या कच्च्या मालाचें रूपांतर सोन्याच्या किंमतीच्या मालांत होऊं लागलें. त्याबरोबर इंग्लंडसारखीं आघाडी गांठलेलीं राष्ट्रें कुबेर बनलीं. अमेरिका तर ताजें राष्ट्र, पण त्यानेंहि राजसत्ता उधळून लावून लोकसत्तेचा नवा पायंडा घातला. त्याबरोबर तेंहि नव्या जोमानें तरारलें. फ्रान्स, जर्मनी इत्यादि राष्ट्रेंहि त्याच्या पावलावर पाऊल टाकून धांवत होतीं. एकदोन पिढ्यांत वरील सारींच राष्ट्रें वैभवसंपन्न बनलीं. पण यामुळें त्यांच्यामध्यें एकोपा मात्र निर्माण झाला नाहीं. बुद्धिमत्ता, महत्त्वाकांक्षा व स्पर्धा यांच्या चढा-ओढींत अंतस्थ द्वेषभाव आपोआपच उदयाला आला !

यांतच शास्त्रीय शोध व यंत्रें यांची वाढ झपाट्यानें होत गेली. वाणिज्य–व्यवसायाला अगदीं नव्या प्रकारचें विराट स्वरूप प्राप्त झालें. या सर्व स्थित्यंतराचा परिणाम असा झाला कीं, चालत आलेली कुटुंब-रचना अडचणीची वाटूं लागली, समाजधारणा नव्या वळणावर जात चालली, राज्यपद्धति बदलली आणि राष्ट्राराष्ट्रांतील संबंध गुंतागुंतीचे होऊं लागले. अर्थात् या उलथापालथीचा परिणाम वाङ्मयावर न होणें अपरिहार्यच होतें. म्हणून वाङ्मयांत नवे विषय, नव्या कल्पना, नव विचार आपोआपच उद्भवले ! स्त्रीपुरुषसंबंधांतील नीतीच्या रूढ कल्पना बदलल्या पाहिजेत, समाजाची रचनाहि नव्या पायावर झाली पाहिजे, आर्थिक व्यवहार बदलले पाहिजेत इत्यादि नवे विचार व नव्या योजना पुढें येऊं लागल्या. त्याबरोबर समाजशास्त्रज्ञ व विचारवंत पुढारी यांना या नव्या युगधर्माचा विचार करणें आवश्यक वाटूं लागलें. हळू हळू तसे प्रयोगहि सर्वत्र सुरू झाले.

युरोप–अमेरिकेंतील सध्यांचें मानसशास्त्र ( Psychology ) व त्याच्याच पोटीं जन्मास आलेलें मनोविश्लेषण (Psycho-Analysis) याचा कुळकथा वरील पंथातीलच होय. अर्थ व काम या दोन स्तंभावर त्यांची उभारणी आहे.

## ३

स्वत:ला कल्याणप्रद होईल असें ज्ञान कोणापासूनहि घ्यावें. मात्र तें खरेंच निर्मळ व हितावह असावें. सोनें म्हणून बेगड घेऊं नये आणि कांचेच्या तुकड्याला हिरा समजून भाव देऊं नये.

आज झालें आहे काय कीं, पाश्चिमात्य लोक अत्यंत वैभवसंपन्न, पूर्ण स्वतंत्र आणि जगज्जेते असल्यामुळें त्यांचे सारे आचारविचार अत्यंत भडक वाटतात. ते म्हणतील, बोलतील व करतील तें एकांगी,

अविचारी, परिणामीं घातक व अगदींच खुळचट असूं शकेल, हें आमच्या ध्यानांतच येत नाहीं. यामुळें आमची दिशाभूल होते. या अनर्थाला आपण जपलें पाहिजे. जें कांहीं नवें स्वीकारावयाचें तें नीट पारखून घेतलें पाहिजे.

एक गोष्ट ध्यानांत घेण्यास हवी. पाश्चिमात्य राष्ट्रें ज्ञानबलानें वैभवसंपन्न झालीं आहेत खरीं; पण त्याबरोबरच त्यांच्या एकंदर जीवनांत तापदायक असा गोंधळहि खूपच माजलेला आहे. आणि तो कसा आवरावा हें त्यांचें त्यांनाच कळेनासें झालें आहे. 'अति शहाणा त्याचा बैल रिकामा' या म्हणीचा रोकडा अनुभव त्यांच्याकडे स्पष्ट दिसूं लागला आहे. आतं विद्वान् तो अति चारगट हाहि प्रकार आहेच. यामुळें नव्या नव्या आचारांविचाराचे भडक तारनळे सारखे सुटत आहेत !—दुर्दैवानें त्यांतील भडकपणा तेवढा आम्हाला दिसतो; पण त्याच्या आजूबाजूचा अंधार दिसत नाहीं. युरोप—अमेरिकेंत, खून, मारामाऱ्या, चोऱ्या, दरोडे, व्यभिचार व लाडीलबाडी याना विलक्षण ऊत आलेला आहे, ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे. तर या अनर्थाचीं कारणें काय असावीं, याचा विचार आम्हीं स्वहिताच्या दृष्टीनें केला पाहिजे, हें काय सांगायला पाहिजे ?

कित्येक वेळां एखाद्या विषयाची दुसरी विरोधी बाजू आम्हाला धडपणें कळतच नाहीं. बर्ट्रांड रसेलची नवी नीतीच घ्या. ही काय तिकडे सर्वमान्य आहे ? पण आम्ही मात्र माकडाप्रमाणें तेवढीच कोळीत घेऊन नाचतों. फ्रॉईडच्या लैंगिक तत्त्वज्ञानाचा तोच प्रकार. त्यांत फार गचाळ भाग आहे, विचारसरणी एकांगी आहे असें तिकडचेच शास्त्रज्ञ म्हणूं लागले. तरी आम्ही फ्रॉईडला मुज्ञ समजतों. हीच गोष्ट कार्ल मार्क्सच्या आर्थिक वादाची. त्याच्याहि अशाच चिंधड्या उडाल्या आहेत !—कां ?—

मनुष्यस्वभावाच्या मुळाला धरून ती विचारप्रणाली नाहीं म्हणून. तात्पर्य, तिकडचे कोणतेहि वैचारिक प्रयोग आम्हीं चटकन् हाताळूं लागणें किंवा त्यांना बरोबर मानून त्यांचें अनुकरण करणें, आम्हांला हितावह होणार नाहीं. हवापाणी, अन्न, परंपरा यांना धरून मनुष्य वागत असतो. माणसां-माणसांतील फरक त्यामुळें आहे. देहरचना, मनाची ठेवण आणि विकार यापक्षीं जगांतील सारीं माणसें सारखीं भासत असलीं तरी 'पिंडे पिंडे मतिर्भिन्ना' हें आहेच. राष्ट्रांनाहि हाच नियम लागू आहे. इंग्लंड-अमेरिकादि राष्ट्रें भारताहून भिन्न आहेत, याची जाणीव आम्हांला असली पाहिजे. इंग्रज वा अमेरिकन जसा आहे, तसे आपण हिंदू खास नाहीं. आमचा पिंड वेगळा आहे. कांहीं बाबींत पाश्चिमात्य आमच्यापेक्षां श्रेष्ठ असतील पण मग कांहीं बाबींत आम्ही त्यांच्यापेक्षां श्रेष्ठ असूं यांत शंका नाहीं. असलें भिन्नत्व ओळखून आम्हीं वागलें पाहिजे.

इंग्रज-अमेरिकनाप्रमाणें आपण नाहीं, याची लाज आम्हांला वाटता कामा नये. जीवन जगण्याची, त्याविषयीं विचार करण्याची वा त्याविषयीं व्यवस्था लावण्याची आमची रीत वेगळी असल्यास, त्यांत कमीपणा तो काय आहे ? पारतंत्र्यामुळें आज आम्ही हीनदीन आहों, जगांत आम्ही निष्प्रभ आहों व आम्हांला मानहि नाहीं; पण याचा अर्थ आम्ही स्वत्व सोडावें असा थोडाच आहे ? आमच्या धर्माला, संस्कृतीला व प्राचीन ज्ञान-संपदेला खूपच मालिन्य आलें आहे, ही वस्तुस्थिति नाकारण्यांत अर्थ नाहीं. पण त्याची खत मानून, आम्ही त्या त्या गोष्टी टाकूं तर ?—आम्ही नामशेष होऊं हें नक्की. म्हणून स्वत्वाची कोणतीहि गोष्ट न सोडतां स्वाभिमानानें जगण्यास आम्हीं शिकलें पाहिजे.

एक गोष्ट आतां सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट झाली आहे कीं, अखिल मानवजातीचें कल्याण होईल असा मार्ग पाश्चिमात्यांना सांपडलेला नाहीं.

सारीं पुढारलेलीं पाश्चिमात्य राष्ट्रें अत्यंत स्वार्थी, ढोंगी व नृशंस वृत्तीचीं आहेत. त्यांपैकीं कोणतेंहि आम्हाला मार्गदर्शक होण्यासारखें नाहीं. उलट, प्रत्येक आपल्यापरी पूर्ण अपात्र व अयोग्य आहे. माणुसकीच्या निकषावर तुलना करण्याचें झाल्यास आमचें मानवजीवनविषयक तत्त्वज्ञान निःसंशय श्रेष्ठ आहे. पाश्चिमात्यांची सर्वभक्षी भोगलालसा कमालीची स्वार्थी आणि म्हणूनच हीन आहे तर त्या मानानें आमच्या धर्माची शिकवण केवळ त्यागाची म्हणूनच श्रेष्ठ आहे. आचरण्यास सोपी व स्वभावतः उदात्त आहे.

याकरितां **आपण आहों माणसें** या प्रबंधाचा विचार आम्हीं आमच्या स्वतंत्र भूमिकेवरून केला पाहिजे, तरच परिणामीं हित होईल. असल्या विचारसंग्रहाच्या बाबतींत आम्ही खूप श्रीमान् आहों. अनुकरण किंवा भलती उसनवारी करण्याचें कारण आम्हाला नाहीं.

४

मानवस्वभाव व मानसशास्त्र यांसंबंधीं बहुविध विचार आमच्या पूर्वजांनीं केले आहेत व त्यांची परंपरा पुढेंहि चालू आहे. तरीपण पाश्चिमात्यांनीं या विषयाकडे ज्या धर्तीनें पाहिलें आहे तसें आम्हीं केलेलें नाहीं, ही गोष्ट मान्य केलीच पाहिजे. महाभारतांत मानवस्वभावाचें दिग्दर्शन उत्कृष्ट आहे व गीतेंतील मानसशास्त्र श्रेष्ठ प्रतीचें आहे, यांत शंका नाहीं; पण त्यांचा उपयोग आज करून घ्यावयाचा झाल्यास आम्हाला नव्यानें विचार केला पाहिजे आणि नवी दृष्टि लावून अभ्यास केला पाहिजे. जुन्या अलंकारांतील सुवर्ण बावनकशी, पण जीर्णत्वामुळें ते अलंकार अवजड असतील, नव्या कालास शोभण्यासारखे नसतील तर ? —आम्हाला सोनें गाळून घेऊन, त्यांतील हीन बाजूला करून नव्या घडणीचे नवे अलंकार केले पाहिजेत, नाहीं का ?

आमची प्राचीन विचारसंपदा या दृष्टीनें शुद्ध करून घेतली पाहिजे, आणि हें करितांना आम्हीं पाश्चिमात्यांचें अनुकरण केल्यास कांहींच बिघडणार नाहीं.

गेल्या दोन शतकांतील इंग्लंड-अमेरिकादि राष्ट्रांचा उत्कर्ष हा केवळ यदृच्छया थोडाच झालेला आहे ? त्या देशांनीं तशी तपस्या केली, राष्ट्रीय सद्गुण पराकोटीला नेले आणि अविश्रांत श्रम करून सर्वश्रेष्ठ पद पत्करलें. मग त्यांच्या ज्ञानाकडे, संस्कृतीकडे, वाङ्मयाकडे व नव्या तत्त्वज्ञानाकडे सहानुभूतीनें व आदरानें पाहाण्यास हरकत कोणती ?—आपले अवगुण शोधून त्यांचा त्याग करणें जितकें हिताचें व आवश्यक, तितकेंच परक्यांचें चांगलें असेल तें पाहाणें व त्याचें अनुकरण करणें हिताचें आहे.

या दृष्टीनें इंग्रजी भाषेचें वाङ्मय मोठें सत्वाढय आहे. मानव-स्वभाव किंवा मानसशास्त्र हाच विषय घ्या आणि एतद्विषयक इंग्रजी ग्रंथ चाळून पाहा. विषयप्रतिपादन असें रेखीव, स्पष्ट, आटोपशीर व मोहक असतें कीं, कौतुक करीत राहावें. या विषयावर निघालेला प्रत्येक ग्रंथ असा असतो, असें म्हणण्याचा भावार्थ नाहीं. काय आपल्याकडे नी काय त्यांच्याकडे, लोकप्रिय विषयांचा चिवडा करण्याचें कार्य उपटसुंभ करतातच ! पण तेवढ्यानें खऱ्या बुद्धिमानांच्या प्रामाणिक प्रयत्नांची योग्यता मुळींच कमी होत नाहीं. कांचमण्यांनीं बाजारपेठ व्यापली असली तरी हिऱ्यांना कमीपणा थोडाच येतो ? तसें वरील विषयावरील वाङ्मयाचें आहे.

मानवस्वभाव !—किती सुंदर विषय आहे. याविषयीं जीं चारदोन सुंदर पुस्तकें वाचण्यांत आलीं, त्यांत हर्बट एन्. कॅसन यांचें Human Nature हें पुस्तक मोठें स्वारस्यपूर्ण, आटोपशीर व चटकदार आहे. त्याच्या आधारें पुढचीं कांहीं प्रकरणें सांगण्याचा विचार आहे.

जगाच्या पाठीवर दोनशें कोटी लोक अनेक वंशांचे व भाषाचे म्हणून पसरले असले आणि त्यांच्यामध्यें स्वभावभिन्नत्वही अवाढव्य असलें तरी कांहीं कांहीं गोष्टींत सारींच माणसें एका माळेचे मणी कसे आहेत हें दाखवितां येणें अशक्य नाहीं. उदाहरणार्थ, स्वसुखाविषयीं तीव्र इच्छा, ती पूर्ण होण्यास लागणारी स्वार्थी वृत्ति आणि तसें न घडल्यास होणारें दुःख वा उसळणारा क्रोध हा प्रमुख स्वभावविशेष मनुष्यमात्रांत आढळेल कीं नाहीं ?—निःसंशय आढळेल. मग व्यक्ति इंग्लंडांतील असो, हिंदुस्थानांतील असो, नाहींतर उत्तर ध्रुवाकडे राहणारी असो. विस्तवाच्या गुणधर्माप्रमाणें हा प्रकार आहे. विस्तव कोणत्याहि स्थानीं वा कालीं असो, तो दाहक असणार हें निश्चित. याच पद्धतीला अनुसरून मनुष्यमात्रांत आढळणाऱ्या गोष्टी सिद्धांतरूपानें मांडतां येण्यासारख्या आहेत. कॅसनसाहेबांनीं अशीं कांहीं अनुमानें बांधून मानवस्वभावाचें दिग्दर्शन केलें आहे, तें समजून घेण्यासारखें आहे. मात्र त्यांनीं ज्या दृष्टीनें विचार केला, तसें आपल्यास करावयाचें नाहीं. त्यांच्या कथनाचा यत्किंचितहि विपर्यास न करितां मुख्य धागा त्यांचा घ्यावयाचा व बाकीचें विवेचन आपल्या पद्धतीनें करावयाचें.

कारण एकच. आपल्या प्राचीन विचारसंपदेंत नेमक्या त्याच गोष्टी आहेत. पूर्वींची विषयाची मांडणी साररूपानें आहे तर साहेबमजकुरांची मांडणी जरा विस्तृत, नव्या रंगारूपाची आहे.

---

## प्रकरण पांचवें

### १




आमच्या इकडच्या तत्त्वज्ञानाप्रमाणें मानवी जीवनाचा जो विचार केला गेला आहे तो किती साररूपानें दर्शविला आहे, त्याचें हें वरील चित्र आहे.

मनुष्यमात्रामध्यें तीन ईषणा अत्यंत प्रबळ आहेत. त्या पूर्ण व्हाव्यात म्हणून प्रत्येक मानव यथाशक्ति झगडत असतो आणि त्यांच्या पूर्तींत त्याचें सुख सांठविलेलें असतें.

## प्रजा धन कीर्ति

प्रजा कशाकरितां ?—वंश चालावा, आपण सदा कोणत्या ना कोणत्या रूपांत जिवंत राहावें म्हणून. म्हणजे एक प्रकारें माणसाला चिरजीवन हवें असतें. स्वतःचा देह तसा समर्थ नाहीं, तर आपली प्रजा सही.

धन कशाकरितां ?—जीवन चालण्याकरितां लागणारें अन्न-वस्त्र-गृह पाहिजे म्हणून. अर्थात् धन म्हणजे केवळ सोनेंनाणें नव्हे. आपल्याला इष्ट वस्तु प्राप्त होण्यास लागणारें व मोबदल्यांत चालणारें कोणतेंहि साधन म्हणजे धन. असल्या धनाचें स्वरूप देश-काल-परिस्थितीप्रमाणें पालटत राहातें, हें आपल्या अनुभवाचें आहेच. एके काळची सोन्याची पुतळी आज कागदाच्या नोटींत आढळते. हा चमत्कार बरा कीं वाईट हा प्रश्न अलाहिदा.

कीर्ति कशाकरितां ?—समाजांत सुरक्षितपणा लाभावा म्हणून. या साधनालाहि अनेक पर्याय आहेत. यांत आपण कोणी आहों हा अहंकार असतो, लोकांनीं भलें म्हणावें ही इच्छा असते व प्रतिष्ठेंत सौख्य असल्याचें समजतें.

अशा या तीन इच्छा प्राणिमात्राच्या मागें लागल्या आहेत आणि त्यांचीं साधनें आहेत कामक्रोधादि षड्विकार.

सत्प्रवृत्ति असत्प्रवृत्ति व या दोन गोष्टीहि मनुष्यमात्रांत सरसहा आढळतात. कधीं त्या अगदीं एकएकट्या असतील. कधीं सरमिसळ असतील. माणूस निरा दुष्ट किंवा सुष्ट नाहीं. षड्विकाराचा प्रक्षोभ किंवा प्रवाह ज्या प्रतीचा असेल, त्याप्रमाणें मानवाचें जीवन बनत जातें एवढें खरें.

आतां कॅसन महाशयांच्या विचारांकडे वळूं. त्यांनीं मानवस्वभावासंबंधीं छाननी करून, जे पैलू पाडले आहेत त्यांची यादी अशी—

१—प्रत्येकजण गरजवन्त आहे.

२—प्रत्येकांत विकारप्राबल्य आहे.

३—प्रत्येक भयग्रस्त आहे.

४—प्रत्येक अनुकरणप्रिय आहे.

५—प्रत्येक आपल्यापरी वेगळा आहे.

६—प्रत्येक अंधविश्वासू आहे.

७—प्रत्येकांत विचारप्रवणता आहे.

८—प्रत्येक संवयीचा गुलाम आहे.

९—प्रत्येक सारखा बदलत राहातो.

१०—प्रत्येकांत स्तुतिनिंदेची आवश्यकता आहे.

११—प्रत्येकास पुढारी हवा असतो.

१२—प्रत्येकास लिंगभेद आहे.

१३—प्रत्येकास दुहेरी मन (Conscious and sub-conscious) आहे.

१४—प्रत्येक ध्येयप्रवण आहे.

प्रारंभीं दिलेलें ईषणाचित्र पाहावें आणि ही याद वाचावी. म्हणजे वरील चौदा पैलू प्रजा, धन आणि कीर्ति यांच्याच भोंवतीं फिरणारे आहेत असें आढळून येईल. त्याचप्रमाणें या चौदा लेखांकाचें वर्गीकरण करण्याचें योजिल्यास तीनचार भागांत तें सहज आटोपतां येईल.

एक, दोन, तीन, सहा व आठ यांचा एक गट आहे.

चार, सात, तेरा व चौदा हा एक गट.

पाच, बारा, नऊ हा एक गट.

दहा व अकरा हा चवथा गट करावा किंवा हे दोन्ही लेखांक दुसऱ्या गटांत सामील करून घ्यवे. विशेष गैरसोय होणार नाहीं. मात्र लेखांकांची ही वांटणी साधारण अटकळ येण्यापुरती आहे. यांत इकडचा

लेख तिकडे घालून निराळे गटहि दाखवितां येतील. कारण सर्वांचें मूळ एकच आहे. काव्यांत प्रतीत होणारे नवरस हे एकाच शृंगाररसाच्या वेगळ्या वेगळ्या छटा आहेत असें खाडिलकर नाटककार यांचें म्हणणें आहे. त्यासारखाच मानवस्वभावाचा हा प्रकार आहे. काम हा मुख्य पुरुषार्थ. तो यथासांग व्हावा म्हणून अर्थाची आवश्यकता. कामाची पूर्ति अपत्यप्राप्तीनें. काम-अर्थ सुरक्षित असावेत म्हणून लोकेषणा. याकरितां कांहीं नियम पाहिजेत म्हणून धर्मस्थापना. आणि सर्वांची सांगता म्हणजे मोक्ष. अशी ही गुंतागुंत आहे. समंजसपणानें ती समजून घेतल्यास मानवीजीवनावर केवढा तरी प्रकाश पडेल.

मोक्ष हा शेवटचा पुरुषार्थ आहे. नव्या विचारप्रवाहाप्रमाणें या पुरुषार्थाला कोणी कोणी बुजतील. पण ऐहिक सुखाच्या दृष्टीनेंसुद्धां मोक्ष हा पुरुषार्थ विचारसरणीय आहे. त्याला जो पारमार्थिक वास आहे तो बाजूला सारून विचार केला पाहिजे. —पण तें विवेचन पुढें पाहूं.

आतां वर दिलेल्या चौदा लेखांत मानवस्वभावासंबंधीं लेखकांनीं कोणती चर्चा केली आहे ती पाहणें इष्ट होईल.

## २

## प्रत्येकजण गरजवन्त आहे.

हा पहिला सिद्धान्त आहे.

अन्न ही माणसाची पहिली गरज होय. हिचें महत्त्व काय वर्णावें ! प्रत्येकास वरचेवर क्षुधा लागणें हा प्रकृतिधर्म असून तिच्या शमनार्थ कांहीं ना कांही खाणें आवश्यक आहे. प्रत्येकाला दिवसातून किमानपक्षीं एकदां तरी गोळाभर अन्न मिळालेंच पाहिजे. पोटाची आग मोठी विलक्षण आहे. ती अमक्याला बाधते नी तमक्याला बाधत नाहीं, असें मुळीच नाहीं. राजा-रंक, ज्ञानी-अज्ञानी, सान-थोर, कवि-रसिक, गणिती-वेदन्ती,

संसारी वा संन्यासी, कोणीहि असो, त्याला क्षुधाशमनार्थ कांहीं ना कांहीं पाहिजेच. मग तें कदान्न असो कीं पक्वान्न असो, झाडपाला असो कीं मांसान्न असो. भुकेच्या वेळीं गोळाभर अन्न पाहिजे एवढें खरें.

ज्ञानात आनंद मानणारा तत्त्वज्ञ, रसाळ काव्यें गाणारा कवि, त्यांच्यावर टीका करणारा पंडित आणि त्या टीका वाचून गप्पा मारणारे तुम्ही-आम्ही वाचक, सर्वजण अन्नाचेच मिंधे नाहीं का?

देहाची नश्वरता, संसाराची असारता व भगवंताची माया इत्यादि वेदान्त सांगून श्रोत्याना डोलावणारे पुराणिक वा कीर्तनकार पोटांत भुकेची कळ उठल्यावर केवळ विठ्ठलनामस्मरणावर वेळ निभावून नेतील काय?

जगांत येऊन पहिला श्वास टाकलेलें बालक. पहिली आरोळी कशाबद्दल मारतें?—दुधाच्या धारेबद्दलच, नाहीं का?—आणि ती त्यास वेळींच न मिळाली तर? आपल्या आकांतानें तें भोवतालच्या माणसांना नकोसें करील.

गरजवन्त मनुष्यमात्राची पहिली गरज ही असून ती शेवटच्या श्वासापर्यंत त्यास पुरून उरते. मात्र ती अल्पायुषी आहे. पोट भरलें, भूक शमली की संपलें. तावत्काल तरी माणसाला अन्नाची किंमत वाटेनाशी होते. पक्वान्नाच्या राशींतून फिरणाऱ्या धनिकाला क्षुधार्त अशा निर्धनाची अन्नाकरिता केलेली याचना तुच्छ कां वाटते?—त्याची भूक शमलेली असते म्हणून. माडीवर भोजनोत्तर वामकुक्षीचा आनंद भोगणाऱ्या रावसाहेबाना दारीं भाकरीकरितां ओरडणाऱ्या भिकाऱ्याची कटकट कां वाटते? त्याचें पोट आकंठ भरलेलें असतें म्हणून.

अन्न मिळालें, पोट भरलें. गरज संपली. पण एवढ्यानें संपलें काय?—नाहीं. अन्नापाठोपाठ वस्त्राची गरज पुढें येते. शरीर झांकण्याचें शिकल्यापासून माणसाच्या मागें ही आच्छादनाची कटकट लागलेली आहे. ऋषी वल्कलें नेसतील, रानटी मनुष्य झाडपाल्यांनीं अंग झांकील, गरीबगुरीब

जाडेंभरडें कापड वापरील. श्रीमंत लोक रेशमी आभरणें ल्यातील. प्रत्येकास कांहीं ना कांहीं शरीर झांकण्यास पाहिजे. वेड्याखुळयांची गोष्ट अलाहिदा. पण बाकी सर्वांना वस्त्राची गरज तीव्रतेनें भासते यांत शंका नाहीं.

अन्न-वस्त्राची व्यवस्था होतांच माणसाचा 'पाहिजे' घरादाराकडे वळतो. पोटास अन्न, शरीरास वस्त्र तसें रात्र कंठण्यास, विश्रांति घेण्यास, माणसाला काहीं तरी आश्रयस्थान लागतें. मग ती गुहा असो, गवताची झोंपडी असो, किंवा संगमरवरी राजवाडा असो. एकामागून एक अशा या तीन गरजा मोठ्या प्रबल आहेत व त्या येन केन प्रकारेण भागविल्यावांचून माणसाची सुटका नाहीं. सर्वसंगपरित्याग करूं इच्छिणाऱ्या विरागी माणसाला सुद्धां यांचा त्याग करतां येत नाहीं. म्हणूनच संसारविरक्त अशा तुकाराम-बुवांनासुद्धां—

निर्वाहापुरतें अन्न आच्छादन।
आश्रमासि स्थान कोपी गुहा॥

एवढें साधें मागणें देवाजवळ मागावें लागलें. तीन गरजांच्या मगरमिठींतून बिचारे तेहि सुटले नाहींत !

बरें, या एवढ्या गरजांनीं माणसाचें भागतें का?—मुळींच नाहीं. एका गरजेंतूनन दुसऱ्या अनेक गरजा, कर्दळीला धुमारे फुटावे त्याप्रमाणें फुटत असतात. साध्या अन्नांतून हजारों प्रकार कां निघाले? वस्त्रांची गरज तेवढ्यापुरतीच कां भागत नाहीं? साध्या झोंपडींतूनच वास्तुशास्त्राचा अफाट पसारा कां झाला?—गरजांतून गरजा निघाल्या म्हणून. मुळाक्षरांतून शब्दसिद्धि, शब्दांतून भाषा आणि भाषेंतून वाङ्मय! याप्रमाणें मूळच्या तीन गरजा अनेक रूपांनीं नटल्या!

मनुष्यमात्र गरजवन्त आहे तो असा.

यामुळें काय झालें? —मोठमोठीं दुकानें त्याकरितां थाटलीं. मोठमोठ्या पेठा त्याकरितां वसल्या. अनेक कारखाने धूमधडाक्यानें चालू

झाले ! आगगाड्यांसारखीं वाहनें निघालीं. तारा-पत्रांचा सुळसुळाट झाला. आगबोटी दूर दिगन्तरीं धांवूं लागल्या. आणि खेडीं मागें पडून मोठमोठीं नगरें वसलीं ! सर्व व्यापार, वाणिज्य, उद्योगधंदे, दळणवळण, धांवपळ आणि मी-तूं-पणा कशाकरितां ? अन्नाची गरज भागावी, वस्त्रें पांघरण्यास असावीं आणि आश्रयास घरें असावीं म्हणूनच नाहीं का ?

एवढ्यावर तरी निभावलें आहे का ? —नाहीं. मनुष्याचा 'पाहिजे' अनंत झाला आहे. कोणाची म्हणून आहे त्यांत तृप्ति नाहीं. प्रत्येक व्यक्ति कोणत्याना कोणत्या हव्यासानें ग्रासलेली आहे. "हें पाहिजे, तें पाहिजे. माझ्याजवळ नाहीं तें मला पाहिजे." या आक्रोशानें साऱ्या जगाचें वातावरण कोंदलेलें आहे. भिकारी भाकरीकरितां रडतो तर राजाहि राज्य अपुरें म्हणून रडतो ! कामी माणूस जोडीदाराकरितां आर्त आहे तर लोभी माणूस आणखी धन कसें सांठवीन या तळमळींत आहे. सर्वांचा आक्रोश एक-'मला कांहींतरी पाहिजे'.

माणसाच्या जीवनाचा पट असल्या गरजांच्या आडव्या-उभ्या धाग्यांनीं बनलेला आहे. मनुष्य जों जों सुधारत चालला, तों तों त्याच्या गरजा व इच्छा वाढल्या. त्याबरोबर ओसाड देश मनुष्यवस्तीनें गजबजले, भूमीच्या स्वामित्वाकरितां लढाया झाल्या. नव्या नव्या राजवटी आल्या व नाहींशा झाल्या. मोठमोठे समाज उदयाला आले नी कालांतरानें नामशेष झाले ! —मागचा इतिहास हा असा आहे. वर्तमानकालच्या घडामोडी हेंच दर्शवितात. भविष्यकालीं असेंच घडत राहाणार ! यावरून मनुष्यमात्र गरजवन्त आहे व त्याच्या पूर्तीकरितां तो सारखा धडपडत असतो, हा त्रिकालाबाधित नियम आहे हेंच सिद्ध होतें.

आतां प्रश्न असा कीं, हा सिद्धान्त समजल्यावर त्याचा व्यक्तिशः उपयोग काय करून घेतां येईल ?—उत्तर सोपें आहे. व्यक्तीच्या वा समाजाच्या गरजा ओळखून त्या यथायोग्य प्रकारें भागविण्याचें कार्य ज्याला

साधेल, त्याला ऐहिक यशाची गुरुकिल्लीच सांपडली म्हणायचें. डॉक्टर वा वैद्य चांगला कोणता? लोकांना जो झटपट आरोग्य देऊं शकेल तो. चांगला वकील कोणता? दावा जिंकून दाखवील तो. उत्कृष्ट गवई कोणता! लोकांना प्रसन्न करील तो. असें सर्व गोष्टींत आहे. लोकांची गरज ओळखून ती भागविण्यास पुढें सरणारा माणूस सर्व स्थानीं हवा आहे.

जो उत्तम गुणें शोभला। तोचि पुरुष महाभला।
कित्येक लोक तयाला। शोधीत फिरती॥

समर्थांची ही उक्ति अक्षरशः खरी; पण लोकांना हा असला गुणी कळला पाहिजे. तो त्यांची गरज भागविणारा असला पाहिजे. योग्यता व यश यांचा संबंध आहे. परंतु योग्यता असली म्हणजे यश मिळतेंच असें नाहीं. ती योग्यता लोकांच्या गरजेंत बसली पाहिजे. शिवाय 'गरज सरो नी वैद्य मरो' ही म्हणहि ध्यानांत ठेविली पाहिजे.

अशा प्रकारें वरील सिद्धान्त पटवीत असतां उत्कर्षेच्छु तरुणांना कॅसन महाशयांनीं एक कानगोष्ट सांगितली आहे. त्यांचें म्हणणें असें: व्यक्तीच्या वा समाजाच्या कांहीं गरजा जुनेपणामुळें कमी होत जातात व कांहीं नव्या उत्पन्न होतात. अशा वेळीं कल्पक मनुष्यानें समाजास नव्या गरजा शिकवाव्या आणि त्या भागविण्याची योजना आखून यश मिळवावें. अर्थात् वाटेल त्या खोट्या व भ्रामक गरजा लोकांच्या गळीं उतरवावयाच्या असें मात्र नाहीं.

आपला समाज प्रगत व्हावा व राष्ट्राचें कल्याण व्हावें अशा चांगल्या गरजा निर्माण केल्या पाहिजेत व फसव्या गरजा नामशेष केल्या पाहिजेत. राष्ट्राच्या गरजांवरूनहि त्याची नीतिमत्ता, थोरवी व ध्येय कळतें. म्हणून याविषयी योग्य ती दक्षता घेतली पाहिजे.

ही कल्पना ठीक आहे; पण सध्यांच्या जाहिरातबाजीच्या युगांत हें शक्य कसें आहे एवढाच प्रश्न आहे. केवळ जाहिरातीच्या जोरावर

कांहीं लबाड लोकांनीं जगाला कसें बनविलें आहे, याचीं शेकडों उदाहरणें युरोप- अमेरिकेंतच घडलीं आहेत; आपल्याकडेहि तोच अनुभव आहे. तेव्हां लोकांना चांगल्या व नव्या गरजा शिकवावयाच्या कशा, हें कोडेंच आहे.

आमच्या इकडची शिकवण आहे, माणसानें आपल्या गरजा कमी करण्यांतच त्याचें हित आहे. कॅसनसाहेबांच्या वतीनें पाश्चिमात्यांची शिकवण अशी-लोकांना नव्या गरजा शिकवा. त्यांच्यामध्यें नव्या गरजांची आवड निर्माण करा आणि त्या पुरवून धनाढ्य व्हा !—खरें कोण ?

गरजा कमी करण्याची शिकवण आमच्या अंगीं मुरली का ?–नाहीं. उलट, साध्या अन्नवस्त्राकरितांहि परक्यांच्या तोंडाकडे पाहण्याची दुर्दैवी पाळी आमच्यावर आली.

बरें; आपल्या गरजा अफाट वाढवून युरोप-अमेरिकेंतील प्रजा तरी सुखी झाली आहे का ?–नाहीं. तिकडच्या लोकांचें वैभव वाढत गेलें पण त्याबरोबर त्यांचा जीवनकलहहि अनेक भानगडींचा, ओढाताणीचा व अकारण कष्टाचा बनला ! म्हणजे गरजा कमी केल्याचें श्रेय आम्हां भारत-वासीयांना मिळालें नाहीं. पाश्चिमात्यांनीं त्या भरमसाट वाढवूनहि त्यांना तें मिळालें नाहीं !

नवलाची गोष्ट. पण याचें उत्तर इतकें अवघड खास नाहीं. कोणत्याहि गोष्टीचा अतिरेक हा हानिकारच. आम्ही साध्या ऐहिक सुखा-विषयीं उदासीन, आळशी, निष्क्रिय बनत गेलों. पाश्चिमात्य अतिहव्यासानें गोंधळांत पडले ! तात्पर्य, आपल्या प्रमुख आसक्ति किती वाढवावयाच्या वा कमी करावयाच्या, याचा सुमार पाहिजे. इकडे दुर्लक्ष केल्यास मनुष्य-मात्रांतील विकारप्राबल्य भलत्याच दिशेनें वाढूं लागतें, हें याचें उत्तर.

---

# प्रकरण सहावें

## १

प्रत्येकांत विकारप्राबल्य आहे.

मथळ्यातच लेखाङ्क इतका स्पष्ट आहे कीं, मानवस्वभावाची एवढी तेवढी ओळख असणाऱ्या व्यक्तीला तो तात्काल पटेल.

आपण माणसें म्हणजे आतगांत प्रज्वलित असलेल्या मनोविकारांचे लहानमोठे ज्वालामुखीच !—जनलज्जा, कायदा, प्रतिकाराचें भय, स्वसुख निर्वेध राहाण्याची तीव्र इच्छा, आणि मर्यादित सामर्थ्याची जाणीव यांचे थरावर थर रचलेले आहेत म्हणून बरें. नाहीतर—कल्पना न करणें भली गोष्ट.

उंच उंच पर्वतशिखरांनी शृंगारलेल्या व सुंदर वनश्रींचीं आभरणें धारण केलेल्या वसुंधरेच्या पोटीं केवढी प्रचंड उष्णता धगधगत आहे! झिम् झिम् पावसाच्या वर्षावानें सगळीकडे गारेगार करणाऱ्या काळ्या काळ्या मेघपङ्क्तीच्या आड कोण नाचतें आहे!—अजस्र शिलाखंड फुगडणारी व मोटमोठ्या वृक्षराजांना मातींत लोळविणारी विद्युल्लता!—याच धर्तीनें मनोविकाराच्या बऱ्यावाईट अग्निज्वाला माणसाच्या मनांत धडधडत आहेत.

मनोविकार—काम, क्रोध, हर्ष, चिंता, शोक, भय, तिरस्कार, अहंकार, मत्सर, असूया, लालसा, प्रेम इत्यादि इत्यादि. किती नांवें मोजावी व रूपें दाखवावीं! समुद्राच्या लाटांना जसें मोजमाप नाहीं, ढगांच्या रंगछटायुक्त आकारप्रकारांना जसा धरबंद नाहीं किंवा दिक्कालाला जशी मर्यादा नाहीं, तसें माणसाच्या मनोविकारांचें आहे. त्यांचें जाळें मनांत असें दाट पसरलेलें आहे, कोणत्या वेळीं कोणता तंतू हालेल आणि अर्थांतून अनर्थ निर्माण होईल, याचा काहीं नेम नाहीं. माणसाची प्रत्येक हालचाल या आंतील खळबळीवर अवलंबून आहे.

मनोविकारांच्या या तडाक्यातून कोण सुटला आहे ? वेड्याला ते आहेत, वेदांत्याला आहेत ! दुर्जनाला त्यांनीं सोडलें नाहीं, सज्जनालाही सोडलें नाहीं ! समागमसक्तामध्यें ते दिसतात, संसारविरक्तामध्येंही दिसतात ! अनार्यांवर त्यांची छाप आहे, आर्यांवरही आहे ! काल ते होते आजही ते आहेत आणि उद्याही पण असणार ! मनुष्यमात्र अस्तित्वात असेपर्यंत त्याच्या-मागचा विकारांचा पिंड सुटत नाहीं. म्हणूनच म्हणावयाचें कीं, व्यक्तिमात्र विकारात्मक आहे !

मनुष्य अभ्यासानें आपल्या विकारांना शमवूं शकेल, नियमबद्ध राहून तो त्यांना दाबूं शकेल; परंतु त्यांना सर्वस्वीं नाहींसे करूं शकणार नाहीं ! अगदीं आपले मनोविकार जिंकून "जगाच्या कल्याणा संताच्या विभूती" पदाला पोंचलेल्या महात्म्यालासुद्धा सर्वांभूतीं प्रेम ठेवण्याच्या विकाराचा त्याग करतां येत नाहीं. सज्जनाच्या मनातील वाईट विकार शमत असतील; पण तितक्याच प्रमाणात चांगल्या विकारांची वाढ त्यांच्या मनात झाल्यावाचून रहात नाहीं.

प्रेमाच्या अभावीं द्वेष, धैर्याच्या अभावीं भीति, हर्षाच्या अभावीं शोक यांची वाढ व्हावयाचीच. किंवा त्याच्याउलट प्रकार व्हावयाचा ! पण विकारांची छाप अगदीं नाहींशी होणार नाहीं. त्यांतही अद्वितीय व अलौकिक मनुष्यांची गोष्ट आपण सोडून देऊं; कारण त्यांची संख्या केव्हाही अत्यल्प असणार; परंतु सर्वसाधारण मनुष्यमात्र विकारप्रधान आहे, यात शंका नाहीं.

या विकारप्राधान्यामुळेंच मनुष्यमात्रावर विचारांचा पगडा एकदम होण्यास कठिण पडतें ! मनुष्याच्या मनातील हें भावनाधिक्यच त्यास वस्तुस्थितीचा उमज पडूं देत नाहीं.

मनुष्यजातीचें हित विकारांपेक्षां विचारांनीं ( किंवा विकारांस विचारांची जोड दिल्यानें ) झालें आहे आणि सत्याचा आश्रय केल्यानें प्रगति

होत आलेली आहे. परतु असें असूनही मनुष्यास शांतपणें विचार करण्याचा कंटाळा आहे! सत्याविषयीं तर बोलायलाच नको. मनुष्यमात्र कोणत्या गोष्टीला बुजत असेल, तर तें सत्य होय. सत्याचा आदर व स्वीकार मनुष्यानें एकदम आणि आनंदानें केल्याचा दाखला आतांपर्यंत तरी कोठेंही आणि केव्हांहि घडलेला नाहीं.

मनुष्यमात्रास सत्याविषयीं आदर व आवड तर नाहींच उलट त्याची विटंबना करून त्यास नामशेष करण्याची त्यास अनिवार हौस आहे. या हौसेचीं कितीतरी उदाहरणें सबंध मनुष्य जातीच्या इतिहासांत सांपडतील.

ज्या ज्या काळीं एखाद्या सत्पुरुषानें लोकोपकारक असें सत्य जगापुढें मांडलें आहे, अथवा एखाद्या शोधकानें एखादें सत्य शोधून काढलें आहे, अथवा कल्पकानें एखादी नवी कला शोधून काढली आहे त्या त्या वेळीं मनुष्यमात्रानें त्या त्या मनुष्याची व त्याच्या तत्त्वाची निंदा करून त्यास व त्याच्या तत्त्वास पायांतळीं कुचलून काढण्याचा अट्टाहास केलेला आहे!

साक्रेटिसाला या विकारवशतेनेंच विष पाजलें! ग्यालिलिओला छळ हिनें केला! येशूख्रिस्त हिच्या पायीं क्रूसावर चढला आणि तुकारामाच्या अभंगाच्या वह्या पण हिनेंच बुडविल्या!

मनुष्यमात्राची विकारवशता सर्व काळीं व सर्व ठायीं अशी अबाधित आहे!

व्यक्तिमात्राच्या विकारवशतेनें भूतकाळांत जे काहीं बरेवाईट चमत्कार दाखविले, तेच किंवा तशा धर्तीचे चमत्कार ती आजच्या ज्ञानयुगांतही सर्वत्र दाखवीत आहे. सुधारलेल्या जगाची आजची प्रगती, त्याची ज्ञानवृद्धि, त्याची समाजव्यवस्था व राज्यव्यवस्था, त्याचे कायदे-

कानू, त्याच्या शाळा, त्याचीं ग्रंथालयें, त्याचे निरनिराळे शोध या सर्वांस कारण विकारवशताच आहे ! मागच्याप्रमाणें आज जगाच्या घडामोडींच्या इतिहासाचीं पानें पावलोंपावलीं रक्तानें रंगून निघत नाहींत अगर अश्रूंनीं मलिन होत नाहींत, ही गोष्ट खरी; पण तेवढ्यानें व्यक्तिमात्र निर्विकार झाला आहे, असें मात्र नाहीं. मनांत पेटलेली विकारांची भट्टी आजही पूर्वी इतकीच धगधगत आहे ! फरक एवढाच आहे कीं, तिच्या तोंडावर कायदेकानूंचें, ज्ञानाचें, शहाणपणाचें पातळसें पांघरूण घातलेलें आहे !

व्यक्तिमात्राचे विकार नाहींसे झालेले नाहींत, शमलेले नाहींत, तर दबलेले आहेत, जखडलेले आहेत, झांकलेले आहेत ! प्रसंग पडला नाहीं, परीक्षेची वेळ आली नाहीं तोंपर्यंत आजचा मनुष्य सुसंस्कृत आहे ! परंतु तसा प्रयोग घडतांच तो पूर्वीप्रमाणेंच प्राकृत रानटी-असल्याचा देखावा दृष्टीस पडतो ! स्वतःच्या खुषीखातर नरमेध करणारा तैमूरलंग फार मागें होऊन गेला, परंतु त्याचेच प्रतिअवतार हुकूमशाही वृत्तीच्या अनेक व्यक्तींच्या रूपानें सुंदर राज्यव्यवस्थेच्या आणि सुरक्षित कायदे-कानूंच्या काळांतच आजच्या प्रजेसहि दिसत नाहींत काय ?

कायद्यांची जोखीम बाजूला सारा, ज्ञानाचें अस्तर दूर करा आणि व्यक्तिमात्र विकारात्मक आहे, हा सिद्धांत डोळ्यापुढें ठेवून स्वतःचें, समाजाचें व देशाचें परीक्षण करा, म्हणजे हा सिद्धांत किती अचल आहे, याचा तुम्हास अनुभव येईल.

चांगल्या विकारांचा चांगुलपणा जसा खेड्यांत आढळेल तसाच तो नगरांतहि दिसेल. उलट पक्षीं वाईट विकारांचा हलकटपणा खेड्याच्या कर्दममय गल्लींत अनुभवास येईल आणि शहराच्या विजेच्या दिव्यांनीं लखलखलेल्या डांबरी राजरस्त्यावरहि आढळून येईल ! विकारांनीं बेफाम झालेलें अंतःकरण शालजोडीखालीं असेल, फाटक्या घोंगडीखालींहि असेल !

विकारवशतेच्या दृष्टीनें अत्यंत विद्यासंपन्न व्यक्ति आणि एखादा निरक्षर टोणपा एकाच राशीवर जन्माला आल्याची किती तरी उदाहरणें सापडतील! मनुष्यामध्यें विकाराचें प्राबल्य आहेच तसें अनियंत्रित! असो.

"अनुकूलवेदनीयं सुखम्" या व्याख्येला अनुसरून मनुष्यामध्यें सुखेच्छेचा विकार प्रबळ असल्यामुळें त्या सुखेच्छापूर्तीकरितां आपण आपले विकार भडकूं देतां उपयोगी नाहीं, हें त्यास अनुभवानें कळलें. यातूनच पुढें विचारशक्तीचा उदय झाला. या विचारानें विकारांस पायबंद घालून मनुष्यास सुधारणापंथास लावलें.

सत्यप्रीति ही मनुष्यानें अशीच कटाक्षानें मान्य केली आहे. भावी आरोग्याकरितां रोगी ज्याप्रमाणें कडू औषधास आणि कडक पथ्यास सुखास्थानें मान्य होतो, त्याचप्रमाणें विकारात्मक मनुष्यमात्रानें सत्याचा स्वीकार केलेला आहे.

मनुष्याच्या मनांत विचारशक्ति निर्माण झाल्यावर आणि सत्याचें मोल त्यानें मान्य केल्यावर त्याच्या वाईट विकारांना आळा बसला आणि चांगल्या विकारांना उत्तेजन मिळालें. त्यानंतर हळूं हळू विवाहसंस्था स्थापन झाली, समाजव्यवस्थेचे नियम बनूं लागले, सर्वांच्या सुखसोयींचे कायदे अमलांत येऊं लागले, स्त्रियांचें दास्य नष्ट झालें. गुलाम बाळगण्याची चाल नष्ट झाली, धर्मविषयक कल्पना सुधारत चालल्या.

तात्पर्य, विकार अगोदरचे आहेत आणि विचार नंतरचे आहेत. सत्यप्रीति व कायदेकानू पाळण्याची बुद्धि ही त्यामागूनची गोष्ट आहे.

पतिपत्नींचें परस्परांवरील प्रेम, अनेक कुटुंबें एकोप्यानें राहण्याची तऱ्हा, प्रजेची राजनिष्ठा, राजाचें प्रजापालन, थोर लोकांचा सार्वत्रिक कल्याणार्थ स्वार्थत्याग, स्वदेशसंरक्षणार्थ वीराचें शौर्य आणि देशाभिमान्याची उत्कट देशभक्ति इत्यादि जे अनेक प्रकार आपल्यास दिसतात, त्यांचीं

बरवरचीं कारणें जरी दुसरीं अनेक असलीं, तरी त्यांना पाया विकाराचाच आहे, हें आपण विसरता कामा नये. त्या त्या गोष्टीच्या प्रेमविकारानें सर्व गाडा सुरळीत चालला आहे.

जगाची ही रहाटी सुरळीत चालावी, सर्वांना सुख लागावें, अशी ज्याची इच्छा असेल त्यानें व्यक्तिमात्र विकारात्मक आहे हा सिद्धांत लक्षात ठेवून वागलें पाहिजे. रशियाच्या झारनें ही गोष्ट लक्षात ठेवली नाहीं. आपल्या राजमदात त्यानें प्रजेच्या राजनिष्ठेवर जास्त ताण दिला. त्याचा परिणाम राज्यक्रांतीमध्यें झाला.

केव्हां केव्हां कुटुंबांतून, समाजामध्यें, देशदेशांतरीं, जे अन्याय घडतात अगर अत्याचाराची पुनरावृत्ति होते, याचें कारण कोठेंतरी मनोविकारावर फाजील बोजा पडतो अगर ते नाजूक ठिकाणीं दुखावले जातात, हेंच आहे. फार धाकात धरलेलीं मुलेंच प्रसंग येताच उद्दाम होतात, हा चमत्कार आपणांस कितीतरी कुटुंबांतून पहावयास मिळतो.

आज आपल्या समाजांत इंग्रजी शिक्षणानें अलंकृत झालेलीं बहुतेक माणसें स्वधर्माविषयीं उदास असतात अगर त्याविषयीं बोलताना उदासीनतेनें बोलतात. जुन्या मंडळीचा याबद्दल असा समज आहे कीं, अर्वाचीन शिक्षणानें त्यांच्या अंगीं असा नास्तिकपणा येतो आणि आता कलियुग सुरू झाल्यामुळें असा भ्रष्टाकार व्हावयाचाच. परंतु खरें कारण हें नव्हे. धर्माच्या नांवाखालीं समाजावर आचरट रूढींचा जो विलक्षण बोजा पडला, त्याचा वेळ येतांच हा प्रतिकार आहे! असत्यापासून सत्याची निवड करण्याचें सामर्थ्य येताच मनुष्यास बंधन खपेनासें होतें! विचारशक्तीचा दुर्तोंडेपणा खपत नाहीं! नव्या विचाराच्या मंडळींना धर्म नको आहे असें नाहीं, अथवा समाजातील नीतिमत्ता नाहींशी व्हावी असेंही त्यास वाटत नाहीं. रोखठोक व्यवहार पाहिजे. हिंदुधर्माच्या स्वरूपात विलक्षण दुटप्पीपणा आलेला आहे आणि त्याच्या नियमावलिकेंत अत्यंत पक्षपात निर्माण

झालेला आहे. तो नाहींसा व्हावा असें नव्या विचारी लोकांस वाटतें. तसा तो नाहींसा होईपर्यंत व धर्माचें सुसंस्करण अमलांत येईपर्यंत नव्या-जुन्याचा हा झगडा असाच असावयाचा; यांत वावगें कांहीं नाहीं. असो.

तुमचा धंदा कोणताही असो, तुमची परिस्थिति कशीहि असो आणि तुमचा सामाजिक दर्जा कोणताही असो या सिद्धांताचें–व्यक्तिमात्र विकारात्मक आहे या नियमाचें–जर तुम्ही चांगलें मनन कराल, तर तुमचा प्रगतिमार्ग पुष्कळच निष्कंटक होईल. तुम्हाला लौकर यश मिळेल.

जें काम पैशानें होणार नाहीं, अधिकारानें होणार नाहीं, अगर अरेरावीनें होणार नाहीं तें निव्वळ प्रेमाच्या गोड वाणीनें घडून येतें.

एक शिक्षक चांगला असतो, दुसरा वाईट असतो. एक दुकान लोकप्रिय होतें, दुसरें गिऱ्हाइकाच्या अभावीं बंद पडतें! एका कुटुंबांत विलक्षण एकी आढळते तर दुसऱ्यांत बेकीची बजबजपुरी माजलेली असते; एक नोकर इमानी ठरतो तर दुसरा नाठाळ असतो. असे जे चमत्कार दिसतात यास कारण केवळ मनोविकार आहेत. चांगल्या विकारांचा प्रतिध्वनि चांगला आहे, वाईटांचा वाईट आहे! अर्थात् सुष्ट किंवा दुष्ट ठरणें हें आपल्या हातीं आहे.

सर्व विकारांत प्रेम श्रेष्ठ आहे. प्रेम म्हणजे स्त्रीपुरुषविषयक नव्हे किंवा विषयलंपटताहि नव्हे! प्रेम म्हणजे परस्परांविषयीं मला भाव! प्रेमाची संवेदना आकर्षक आहे! इतर सर्व भावनाचें पारिपत्य करण्याचें सामर्थ्य एकट्या प्रेमात आहे!

---

# प्रकरण सातवें

## १

**प्रत्येक भयग्रस्त आहे.**

व्यक्तिमात्रांत विकाराचें प्राबल्य केवढें दांडगें आहे याचें वर्णन गेल्या लेखांत सविस्तर केलें असतां, **भीति** हा विकार स्वतंत्र निवडून काढून त्याच्याविषयीं पुन्हां कांहीं लिहिणें चर्वितचर्वण केल्यासारखें नाहीं का होणार ?—असा प्रश्न अनेक वाचकाकडून येण्याचा संभव आहे. उत्तरार्थ मी एवढेंच म्हणेन. प्रस्तुत लेख समग्र वाचल्यानंतर काय तें ठरवा.

भीति !—मनुष्यमात्रांत हा विकार अगदीं उपजत आहे. घटका आयुष्याचें मूलसुद्धां आवाजाला दचकतें आणि पडण्याच्या भयानें गांगरतें. इतर अनेक दृष्टींनींसुद्धां **भीतीचें** स्वरूप मोठें चमत्कारिक असून तिचे मनावर होणारे परिणामहि विचित्र आहेत.

पहिली ध्यानांत घेण्यासारखी गोष्ट ही आहे कीं, कामक्रोधादि षड्विकार किंवा त्यांच्या आजूबाजूला असणारे त्यांचे इतर भाऊबंद, हे माणसाचे केवळ शत्रु नाहींत माणसानें संयम राखल्यास त्या विकारांचा त्याला चांगला उपयोग होतो. परंतु भीति हा विकार मात्र असा आहे कीं, तो माणसाला मुळांतच आडवतो. संरक्षणाच्या दृष्टीनें भीतीचा उपयोग अल्पमात्र आहे. नाहीं असें नाहीं. पण उपयोगाच्या मानानें अडवणुकीचें प्रमाण फार दांडगें आहे.

भयप्रद अशा कांहीं गोष्टी जगांत आहेत आणि अनेक वेळां माणसाला वाटणारी भीति अस्थानीं नसते. पण एकंदरींत भय निर्माण होतांच माणसाचा अवसानघात होऊन त्याची बुद्धि कुंठित होते व विचारशक्ति अगदीं लुळीपांगळी होते यांत तिळमात्र शंका नाहीं. प्रसंगा-

सभान सुटणें म्हणजे संकट वाढणें किंवा त्यांत गुरफटलें जाणेंच नव्हे का?—मला वाटतें, हा असला अनुभव—भयानें गळाठून जाणें—एकूण एक माणसाना पटण्यासारखा आहे.

भीतीसंबंधीं दुसरा ध्यानांत घेण्यासारखा विशेष म्हणजे ती संसर्ग-जन्य आहे. गर्दीच्या ठिकाणीं हा प्रत्यय उघड उघड दिसतो. एकानें घाबरून ओरडावें आणि पळूं लागावें कीं बाकीचीं बहुतेक माणसें कसलाहि विचार न करतां भयग्रस्त होतात आणि दूर पळूं लागतात. अवसान धरून थांबणारा व भीतीचें कारण शोधणारा विरळाच. भीतीचा हा संसर्ग लक्षांत घेण्यासारखा आहे. जगांतील कित्येक क्रांतिकारक युद्धें केवळ शेवटच्या क्षणाला इकडचीं तिकडे होऊन यशाचें पारडें अनपेक्षितपणें झुकलें आहे! आणि त्याचें प्रमुख कारण कोणीतरी एखाद दुसरी व्यक्ति गर्भगळीत झाली हेंच होय.

याच विकारासंबंधीं तिसरा विशेष म्हणजे त्याचा उद्भव पुष्कळ प्रसंगीं अगदीं अकारण, बिनबुडाचा असतो!—दोरीला साप मानणें आणि झाडाच्या उभ्या खोडाला भूत समजणें हा अंधारांतील चमत्कार सर्वांच्या परिचयाचा आहे. उंदरमामाच्या धावपळीनें जागें झालेलें जोडपें, चोराच्या भयानें सगळ्या आळीचा गोळा करण्यास कसें प्रवृत्त होतें!—हा चमत्कार अगदींच आगळा नाहीं.

भीतीच्या या तिसऱ्या विशेषामुळेंच हा विकार हास्यरसाचा अत्यंत पोषक झालेला आहे. मुळांत भेदरट परंतु बाह्यतः शौर्य-धैर्य दाखविणारा पुरुष किती हास्यास्पद असतो, हें काय सांगायला पाहिजे?

सारांश, भीतीचें स्वरूप इतर विकारांहून वेगळें व परिणामीं घातक असल्यामुळें समंजस माणसानें त्यासंबंधीं विशेष विचार करणें आवश्यक आहे. आम्ही हिंदू लोकांनीं तर अभ्यासच केला पाहिजे या विकाराचा.

या ना त्या रूपानें मनुष्यमात्राच्या मनावर भीतीची पकड एवढी दांडगी आहे कीं, ती हानिकारक ठरली असताहि, माणसाला आपली मुक्तता करून घेणें नीटसें साधत नाहीं. भूतकाळांत हेंच घडलें व आजची विसाव्या शतकांतील ज्ञानी प्रजाहि त्याच चाकोरींतून चालली आहे.

भीति निर्माण होण्याचें प्रमुख कारण, माणसाचें अज्ञान होय. असलें अज्ञान रानटी माणसात आढळतें व सुधारलेल्या माणसातहि. ज्या गोष्टीचा माणसाला नीट उलगडा पडत नाहीं तिला माणूस बुजतो. घोडा पांखराला बुजतो पाखरू पोराला भितें आणि पोर अंधाराला भितें. असली काहीं साखळी सर्वत्र लागलेली आहे.

मनुष्यमात्रांतील कोणतीहि व्यक्ति घ्या. शूर, वीर, तामसी संभावित, पंडित, श्रीमंत, दरिद्री, कोणीहि घ्या. प्रत्येकास कसल्या ना कसल्या भयानें पछाडलें आहे. शूराला पराभवाचें, तामसाला संसारी मोहाचें, संभाविताला अपकीर्तीचें, विद्वानाला अपयशाचें, श्रीमंताला चोराचें, रोग्याला मृत्यूचें, राजाला परक्या राजाचें, अंमलदाराला बडतर्फीचें, मुलाला मास्तरबोवाचें, सावकाराला दिवाळ्याचें, रानटी मनुष्याला भुताखेतांचें, धर्मनिष्ठाला पापाचरणाचें, भिकाऱ्याला भुकेचें आणि ज्ञानी पाश्चिमात्याला साथीच्या रोगाचें भय वाटत असतें, म्हणून कोणी कोणाला हंसण्याचें कारण नाहीं.

याच बाबतींत 'मन चिंती तसें वैरी चिंतीत नाहीं' ही म्हणहि लक्षांत घेण्यासारखी आहे. भीतीमुळें चिंता निर्माण होते कीं, चिंतेमुळें भीति वाटू लागते? --काहीं सांगता येत नाहीं. एवढें खरें कीं, सर्वसामान्यांच्या मनात कसली ना कसली चिंता वावरत असते आणि त्यामुळें भीतीचीं नानाभुतें मनुष्याच्या मनांत सारखीं थैमान घालीत असतात.

संसारातील नाना चिंता केव्हा मिटतील या विचारानें मनुष्य मात्र झुरत असतें आणि तसें स्वास्थ्य असल्यास आहे तें गाडें सरळ चालेल ना? अशी चिंता मागें लागलेली असते. खरें म्हणजे मानवी जीवन हें

लाभहानीमुळें किंवा सुखादुःखामुळें वरचेवर खालवर होत असलें तरी साधारण कालमान कालच्यासारखें आज आणि आजच्यासारखें उद्यां या पद्धतीनें चाललेलें असतें. पुढेंहि तसेंच चालत राहणार असेंहि वाटतें, कळतें. पण माणसाचें मन असें विपरीत आहे कीं, कशाहि अवस्थेंत, कोणतें तरी भय बाळगून चिंतातुर व्हायचें.

योग्य असेल तो जगेल हा जरी सृष्टीचा नियम आहे तरी आपण जगण्याला नालायक आहों असें कोणालाच वाटत नाहीं. म्हणून जो तो जीवन जगण्याकरितां जागरूक राहूं इच्छितो. साक्षेपानें, विचार करीत व धीमेपणानें जगणें अशक्य आहे का ?--नाहीं. पण भय, चिंता, दुःख व यांतून पुन्हा भय अशा दुष्ट चक्रांत माणूस फिरत राहतो.

आणखी एक गंमत आहे. व्यक्तिमात्राच्या भिन्नत्वाप्रमाणें प्रत्येकाच्या भयाचें स्वरूपहि वेगळें असतें. कोणकोणत्या गोष्टीनें भयभीत होईल याचा नेम नाहीं. बिळांत अर्धवट शिरलेला साप ओढून काढणारा बहाद्दर एखादे वेळीं अंगरख्यांत शिरलेल्या झुरळाच्या हालचालीनें घामाघूम होईल. रात्रीं-अपरात्रीं स्मशानांत जाण्यास न भिणारा धीट चार लोकांच्या समोर धीटपणानें बोलण्यास कचरेल. उलटपक्षीं आपल्या वाक्प्रवाहानें हजारों श्रोत्यांना मंत्रमुग्ध करणारा वक्ता घरांत दिव्यावांचून वावरण्यास कचरेल. लढाईत मर्दुमकी गाजविणारा योद्धा अशाच एखाद्या फुसक्या कारणानें कांपूं लागेल. सिंह बेडकाच्या डरॉवाला फार भितो म्हणतात त्यांतलाच प्रकार.

एकदां इंग्रजी साप्ताहिक **पंच** नामक पत्रांत एक विनोदी चित्र पाहिल्याचें आठवतें. एक माणूस एका भयंकर सिंहाच्या पिंजऱ्यांत आश्रय धरून दबून बसला आहे व पिंजऱ्याच्या बाहेर त्याची झाटीपी बायको हातवारे करीत म्हणते—“अहा रे भेदरटा, सिंहाच्या आड लपतोस काय ?--बाहेर ये म्हणजे सांगतें काय गमजा आहेत त्या ?”

यावरून भीति हा विकार कसा आहे, याची थोडी तरी अटकळ येईल. याकरितां ज्यानें त्यानें आपल्याला वाटणाऱ्या भयाचें पृथक्करण करून तें नाहींसें करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. त्याचें समूळ उच्चाटन होणार नाहीं हें निश्चित; पण ऊठ बसल्या त्याच्या आचक्यानें आपलें मनःस्वास्थ्य व शरीरप्रकृति न बिघडेल एवढा प्रयत्न केला पाहिजे. गीतेच्या तत्त्व-ज्ञानाप्रमाणें ' अभयं ' हा मोठा सात्त्विक गुण मानला आहे. अभ्यासानें तो कांहीं अंशानीं अंगी मुरण्यास हरकत नाहीं असें वाटतें.

अज्ञान हें भीतीचें मूळ. तें प्रयत्नानें दूर करण्यास झटावें. याच्या उलट खेळकरवृत्ति ही निर्भयता अंगीं येण्याचें मोठें साधन आहे: मोठ्याच्या मानानें मुलें फार खेळकर असतात. त्याप्रमाणात त्याच्या मनांत भयालाहि स्थान नसतें, हें लक्षात घेण्यासारखें आहे. मुलें खेळांत रंगल्यावर पाहावें. तीं अवघड ठिकाणीं सहज चढतात. अंधारांत जाऊन लपून बसतात. आणि मारक्या जनावरांना न जुमानतां त्यांच्या तडाक्यांतून निसटून जातात ! निरोगी व खेळकर मुलें बहुशः बेडर असतात. थोर माणसांनीं हा बोध घेतला पाहिजे. संसारांत मुलांच्या वृत्तीनें राहाण्यास शिकलें पाहिजे.

ओघाला आलें म्हणून सांगतों. मुलांना भीतीचें बाळकडू आपण मोठीं माणसें पाजतों. अंधारात जाऊं नको, कांहीं चावेल, तिथें चढू नको, पडशील. त्या तिकडे बुवा बसला आहे, तो पकडील. अशा भयाच्या अनेक गोष्टी आम्हीं अगदीं बालवयांत मुलाच्या कोंवळ्या मनावर ठसवितों. या जगात भिण्यासारख्या गोष्टी फार आहेत, आपण पदोपदीं संशयी, भेदरट, चिंतातुर असलें पाहिजे; इत्यादि अयोग्य गोष्टी आपण आपल्या बोलण्यानें, आचारानें व विचारानें मुलांना सारख्या शिकवत राहातों. त्यांचा खेळकरपणा नाहींसा करण्याचा विडा कितीतरी आईबापांनीं उचललेला असतो.

मग आमचीं मुलें तशीं तयार कां होऊं नयेत ? जीं स्वभावतः धीट, खेळकर, आनंदी, विनोदी असतात, तींच थोडीं मोठीं होताच लाजरीं, खिन्न, भेदरट, निरुत्साही दिसूं लागतात. मग आम्हीच त्यांना निगाळा धाक दाखवूं लागतों, धीटपणा शिकवूं पाहातों आणि त्यांच्या भेदरटपणाची हेटाळणी करितों !—मातापित्यांनीं याचा आवश्य विचार करावा.

खरें म्हणजे तरतम भाव ठेऊन मुलाच्या धीटपणाला आपण वाव दिला पाहिजे. अंधार म्हटला कीं भयाची जागा असतेच असें नाहीं. थोडा धोका पत्करला पाहिजेच. मुलाच्या धीटपणामुळें थोडा अपाय, एखादा तेवढा अपघात झालेला पुरवला पण त्यानें भ्याड होणें कामा नये. ही दृष्टि आपण ठेविली पाहिजे. समूळ भीति नष्ट थोडीच होते ? स्वसंरक्षणास आवश्यक अशी सावधानता माणसाच्या अंगीं उपजत आहे; पण ती बाजवीपेक्षा फाजील झाली कीं, भयांत रूपांतर पावते. पुष्ट असणें चांगलें; पण वातुळ असणें हानिकारकच. सावधगिरी व भय यांना हाच नियम लागू आहे.

यानंतर कुटुंबांतील वातावरण निर्भय राहाण्याविषयीं कर्त्यापुरुषानें फारच जपलें पाहिजे. केवळ अरेरावी दाखवून व कुटुंबियांना भयांत ठेवून घरांत स्तब्धता राखणें सांसारिक सुखाच्या दृष्टीनें मुळींच हिताचें नाहीं. कर्ता पुरुषानें घरात येताच बायकांनीं गुपचूप व्हावें, मुलांबाळांचें हसणें खिदळणें थांबावें आणि वातावरण कुद व्हावें, यांत काय मजा आहे ?

राष्ट्रहिताच्या दृष्टीनें आम्ही याचा विचार केला पाहिजे. कुटुंबांतील भीतीचें वातावरणच राष्ट्राच्या अंगात मुरलेलें आहे आणि म्हणून आज तें परतंत्र व अवनत आहे. पददलित राहाण्याची त्यास लाज वाटत नाहीं.

याकरितां भय निर्माण करणारी कोणतीहि गोष्ट मग ती धर्माची असो, रूढीची असो, चालत आलेल्या नीतिनियमांची असो, कायद्याची

असो, किंवा गैरसमजुतीची असो ती अपायकारक आहे असें कळतांच पायातळीं तुडविण्याची आपली तयारी असली पाहिजे. तरच आपण वर चढूं, स्वातंत्र्यास योग्य ठरूं. पारतंत्र्य नाहींसें करूं.

व्यक्तिमात्र भयग्रस्त असतें, हा सिद्धान्त मान्य; पण त्याबरोबरच निर्भयता हा दैवीसंपदेचा महत्तम गुण हें ध्यानीं घेऊन निर्भय होण्यास झटलें पाहिजे.

---

## प्रकरण आठवें

### १

### व्यक्तिमात्र अनुकरणशील आहे.

अनुकरणप्रियता हा माणसाच्या उपजतगुणांपैकीं प्रमुख गुण होय. माणसाच्या प्रगतीला याचा उपयोग झाला असून त्याची कुचंबणा होण्यासहि तो कारणीभूत झाला आहे.

माणसानें नानाविध कला कशा निर्माण केल्या ?—इतर कांहीं उत्तरें आहेत; पण खरें उत्तर आहे : त्याच्या अनुकरणप्रियतेनें त्याला त्या सुंदर गोष्टी सुचविल्या. नृत्य, गायन, नाट्य, चित्रांकन यांचें स्वरूप पाहूं लागल्यास असेंच नाहीं का ध्यानीं येत कीं, हें सारें भोंवतालच्या सृष्टीचें अनुकरण आहे म्हणून ? पशुपक्ष्यांच्या विलासी हालचालींवरून नृत्य व नाट्य आणि स्वरावरून गायनकला निर्माण झाली असें म्हटल्यास अतिशयोक्ति होईल काय ?—त्याचप्रमाणें चित्रकला. निसर्गांतील नानाविध सौंदर्यांचें अनुकरण फलकावर घेण्यांत आलें ती चित्रकला नव्हे का ?—शिल्पाबद्दलहि असेंच म्हणतां येईल नव्हे ?

म्हणून सिद्धान्त : मनुष्यमात्र अनुकरणप्रिय आहे.

अगदीं बालवयापासून माणसाचा हा गुण दिसून येतो. मुलाला समजूं लागतांच तें आपल्या आईचें अनुकरण करूं लागतें. आई बाळाकडे पाहून हंसूं लागतांच तें हंसूं लागतें तिनें हुंकार भरला कीं, तें हुंकार देतें. तिनें मान हालविली कीं तेंहि तीच क्रिया करूं पाहातें.

उलटपक्षीं थोर माणसांनाहि मुलांची नक्कल करण्यांत गंमत वाटते. त्यांच्याप्रमाणें बोबडें बोलणें, खोटें हंसणें–रडणें किंवा वांकुल्या दाखविणें या गोष्टी घरांत मूल असलें कीं, सहजीं घडत असतात. किती आनंद असतो या असल्या अनुकरणप्रियतेंत !

मुलांच्या बऱ्यावाईट शिक्षणाचा प्रारंभ या अनुकरणप्रियतेनेंच चालू होतो. मुलाला वाचा फुटली कीं तें आपल्या मातापित्याच्या वा भावंडांच्या भाषेची नक्कल करूं लागतें. त्याला कित्येक शब्दांचा अर्थसुद्धा नीट कळत नाहीं. पण थोर माणसांचें अनुकरण करणें एवढें त्यास सुचतें.

अर्थ ध्यानीं न घेतां अनुकरण करण्याची मुलाची ही संवय सरसकट माणसांतहि आढळून येते. किती वेळां तरी आपण मनात नसताहि दुसऱ्याचें पाहून पाहून हसतों, रुसतों, रागावतों, खेद करितों, चकित होतों. चार माणसें ज्या मार्गानें जात असतील, तो अनुसरण आपल्यास इष्ट वाटतें. ज्या विषयाची सार्वजनिक थट्टा होत असेल, त्याचीच आपणहि थट्टा करितों. जेथें माणसांची गर्दी जमत असेल, तेथें आपणहि जातों. कित्येक वेळांतर अशी गंमत होते कीं, घोळका कां जमतो आहे याचें खरें कारण कोणालाच उमगत येत नाहीं, तरी माणसें जमतच असतात. एकमेकांचें अनुकरण हाच नव्हे का त्याचा अर्थ ?

माणसाच्या अंगीं अनुकरणशीलता किती रोमरोमांत भिनली आहे, याचें आणखीं प्रत्यंतर पाहावयाचें असल्यास व्याख्यान किंवा कीर्तन यांसारखे समुदाय एकत्र येण्याचे प्रसंग पाहावे. व्याख्यानांत होणारा हंशा

किंवा पडणाऱ्या टाळ्या या क्रिया जमलेल्या श्रोत्यांपैकीं कितीजण हेतूपूर्वक वा लक्ष ठेवून करीत असतील?—हीच अवस्था कीर्तनाच्या वेळची. ईश्वराचा नामगजर किंवा नमस्कारार्थ जोडलेले हात यांतहि यांत्रिकपणाच फार. केवळ एकमेकांचें अनुकरण. आणि यांत मौज अशी : मेंढरासारखी ही वृत्ति आपल्या अंगीं आहे, याची सर्वसाधारण माणसाला दादहि नसते. असो.

सृष्टींतील सौंदर्याचें अनुकरण करीत असतां माणसाला जशा कला लाधल्या, तसेच त्याला या गुणामुळें अवांतर लाभहि झालेले आहेत.

वैयक्तिक शिक्षण होण्यास, समाजाचें संघटन होऊन त्याचें बळ वाढण्यास आणि राष्ट्रीयदृष्ट्या शूरवीर असा दलभार निर्माण करण्यास माणसाची अनुकरण प्रवृत्ति फारच उपयुक्त झाली आहे. एकएकट्या मुलाचें शिक्षण होणें किंवा त्याला शिस्त लावून चांगला नागरिक बणविणें किती कठिण आहे, नव्हे ? पण तीच गोष्ट अनेक मुलें जमवून, शाळा–पाठशाळा स्थापन करून आणि सर्वांचें सामुदायिक मन तयार करून——अमलांत आणणें किती सुलभ आहे, नव्हे ?—अगदीं याच नियमाला धरून समाज बलवान् करणें आणि राष्ट्राच्या रक्षणार्थ सेना सिद्ध करणें शक्य झालें आहे; हें काय सांगायला पाहिजे ? थोडक्यांत सांगायचें झालें तर असें म्हणतां येईल कीं, समाजाला सुशिक्षित, सुसंस्कृत आणि बलिष्ठ बनवावयाचें असल्यास; उद्योगधंदे, वाणिज्य व व्यापार यांचा उत्कर्ष साधावयाचा असल्यास आणि व्यक्तीला मार्गदर्शन करावयाचें असल्यास त्यांच्या अंगीं वसत असलेल्या अनुकरणशीलतेचा उपयोग करून घेतला पाहिजे. व्यवहारांत ‘ढवळ्याशेजारीं बांधला पवळा, वाण नाहीं पण गुण लागला’ अशी एक अगदीं साधी म्हण आहे. तिचें मर्म आपल्या चालू सिद्धान्तामध्यें आहे, हें सर्वांनींच ध्यानीं घ्यावें.

मात्र एक धोक्याची सूचना सांगितली पाहिजे. अनुकरण करण्यांत डोळसपणा—म्हणजेच समंजसपणा—मुळांतच हवा. असें न घडल्यास हीच प्रवृत्ति घातक व हास्यास्पद झाल्यावांचून राहात नाहीं. गांवठी साहेब बनल्यास कसें हंसें होतें, हें काय सांगायला पाहिजे?——इंग्रजांचें वा पाश्चिमात्त्यांचें खुळें अनुकरण आमच्या राष्ट्राला कसें बाधक झालें आहे, हेंहि काय झांकलेलें गुपित आहे? आम्हीं विचार केलाच पाहिजे.

खरा पुढारी, खरा लोकहितचिंतक वा खरा समाजसेवक याविषयीं भारी दक्ष असतो. लोकमान्य टिळकांनीं या पद्धतीनें राष्ट्राला मार्गदर्शन केलें. आज महात्मा गांधी तेंच करीत आहेत.

## २

### मनुष्यमात्र निरनिराळें आहे.

मानवस्वभावासंबंधीं हा एक परस्परविरोधी असा सिद्धान्त आहे. व्यक्ति तितक्या प्रकृति ही म्हण ध्यानांत घेतल्यानंतर पुन्हां मनुष्यमात्र निरनिराळें आहे, हें सांगण्यांत विशेष स्वारस्य काय?—कोणतींहि दहापांच माणसें घेऊन, त्यांचें वरवर निरीक्षण केलें तरी प्रत्येकाची मुद्रा निराळी, रूप निराळें, स्वभाव निराळा असा प्रकार दिसतोच. कोणाशीं कोणाचें साम्य नसतेंच. बरें, या भिन्नत्वाची जाणीव त्या व्यक्तीसहि पुरेपूर असते.

"मी सर्वांसारखा नाहीं. इतरांच्या बरोबर माझी तुलना करूं नका. माझें सारेंच कांहीं वेगळें आहे." इत्यादि बडबड आपण सर्वत्र ऐकतों. तो मनुष्यहि आपल्या कृतीवृत्तींनें तसेंच दाखवित असतो. अहंभावाची ही खोड व्यक्तिमात्रांत सर्वत्र आढळते. मनुष्यस्वभावाचा साररूपानें विचार करितां सकृद्दर्शनीं दिसणारें व्यक्तिमात्राचें हें भिन्नत्व आपणांस अमान्य करतां येणार नाहीं. परंतु एवढ्यावरून प्रत्येक व्यक्ति सर्वतोपरि भिन्न म्हणजे अद्वितीय असें मात्र म्हणतां येणार नाहीं. माणसांसारखीं माणसें

सर्वत्र आढळतात. शूरवीर घ्या, पंडित घ्या, कल्पक घ्या, कलावंत घ्या, उदार घ्या किंवा वक्ता घ्या; त्या त्या लोकांची मोजदाद करायची झाल्यास वाटेल तेवढी संख्या आढळेल!—लोकव्यवहारांत कोणा माणसाची, म्हणजे त्याच्या स्वभावाची, किंवा त्याच्या एकंदर अवस्थेची, आपण माहिती घेऊं लागलों, तर 'आहे चार लोकांसारखा." असाच अभिप्राय आपण ऐकतों. याचा अर्थच हा कीं, आपण सारीं माणसें साधारणपणें सारख्याच पातळींत असतों. त्यांत उठून दिसण्याइतकें भिन्नत्व नसतें.

वस्तुस्थिति अशी आहे कीं, भिन्नत्व वेगळें व अद्वितीयत्व वेगळें. तसें नसतें तर ?—प्रौढ, प्रतापी खरोखरी नामवन्त अशीं नररत्नें वेगळीं दिसलीं नसतीं. साऱ्याच शूरवीरांना श्रीशिवबांचें कार्य करतां आलें नाहीं ! सारेच विद्वान् लोकमान्य होऊं शकले नाहींत ! सारेच थोर महात्मा ठरले नाहींत. कां ?—अत्यंत निवडक असें अद्वितीयत्व फारच अल्प असतें.

मग व्यक्तिमात्रांतील अहंभाव कां आढळतो ?—आपण इतरांहून खरोखरीच कोणी निराळे आहों असें तो कां मानतो ? व तसें कां दर्शवितो ? त्यांच्यांत अल्पांशानें भिन्नत्व असतें म्हणून.

विविधता वा वैचित्र्य ही सृष्टिरचनेंतील प्रमुख लीला आहे. प्राणिज कोटी घ्या, उद्भिज घ्या, नाहींतर अंडज घ्या. निसर्गानें अनंत जाति, अनंत प्रकार निर्माण करुन ठेविले आहेत. आणि त्यांत विलक्षण भिन्नत्व आहे. भौतिकशास्त्रज्ञांचें असें म्हणणें आहे कीं, दोन हिमकण जसे एका स्वरूपाचे नसतात तसेच दोन वाळूचे कणहि एकसारखे नसतात. आंब्याचीं दोन सारखीं दिसणारीं पानें घ्या ना. त्यांचें निरीक्षण केलें कीं, त्यांच्यांतील भिन्नत्व दिसून येतें. फोर्डसाहेबांनीं मोटारींच्या निरनिराळ्या भागांसंबंधींचा एक अनुभव सांगितला आहे. यंत्रांतून, एका साच्याचे बाहेर पडलेले व अगदीं एकसारखे दिसणारे भाग—प्रत्येक कुठें ना कुठें भिन्न राहातोच राहातो. लोखंडी सामानाच्या दुकानीं मिळणारी खिळ्यामोळ्यांची वा स्क्रू

बिजागऱ्यांची पेटी घ्या. अगदीं सारे जिन्नस एकजात सारखे वाटतात. परंतु मुळांत ते तसे असत नाहींत. केसाभराचा कां होईना, फरक प्रत्येकांत पडतो. हें असें कां असावें वा व्हावें?—शास्त्रज्ञांना हें कोडें उलगडलेलें नाहीं. सृष्टीच्या मुठींत तें रहस्य आहे.

आणि तेंच मानवजातीच्याहि वांटणीला आलेलें आहे. माणसें सामान्यतः सारखीं; पण प्रत्येकाच्या आंगठ्याचा ठसा अगदीं भिन्न असतो! एकाच्या आंगठ्याची प्रतिकृति जगांत नसते!

माणसाला ' आपण कोणी निराळे आहों ' असें जें वाटत असतें, त्याचें रहस्य हाताच्या आंगठ्यावरील बारीक रेषांत गुंतलें असेल काय?—अहंभावाचें मूळ तिथें असेल?—कोणीं सांगावें?—एवढें खरें कीं, माणसा–माणसांत आढळून येणारें हें अगदीं चिमुकलें भिन्नत्व नाकारतां येण्यासारखें नाहीं. जगांतील सर्व पुढारलेल्या देशांत चोरादरोडेखोरांचे आंगठे उठवून संग्रहीं ठेवण्याचें व त्यांचें परीक्षण करण्याचें शास्त्रच बनलें आहे. आणि तें इतकें अचुक आहे कीं, कोणत्याहि गुन्हेगाराला स्वतःच्या आंगठ्याचा ठसा ' तो माझा नव्हे ' असें म्हणतांच येत नाहीं.

या भिन्नत्वामुळें माणसाचीं शरीरें व मनें साधारणपणें एका पातळींत असलीं तरी भावनांच्या संबंधांत प्रत्येक व्यक्ति वेगवेगळी असते. आपल्या मैत्रतालींच पाहावें. स्नेहाला योग्य अशीं दोनचार माणसें निवडलीं तरी त्या प्रत्येकाचा चांगुलपणा एकाच स्वरूपाचा नसतो. अधमतेमध्येंही हीच तऱ्हा आढळून येईल. अनेकांची अधमता एकाच मापांत बसूं शकत नाहीं.

व्यक्तिमात्राच्या या भिन्नत्वांत दोन प्रमुख जाति मात्र दिसून येतात. एक कल्पक लोकांची व दुसरी अनुयायांची! अर्थात् समुदायाच्या मानानें एखादाच पुढारी असतो व बाकीचे अनुयायी असतात. या दृष्टीनें विलक्षण कल्पकता वा बुद्धिमता ही तारक आहे व मारकहि. कारण असल्या आद्वि-

तीय व्यक्तींतून समाजाचा पुढारीहि निघूं शकतो किंवा पेंढारीहि होऊं शकतो, आणि बाकीची जनता याच्या किंवा त्याच्यामागून धांवत जाते.

मागील सिद्धान्ताप्रमाणें व्यक्तिमात्र अनुकरणप्रिय असली तरी प्रस्तुत लेखांत सांगितल्याप्रमाणें तिला आपलें भिन्नत्वहि सोडतां येत नाहीं. आपण कोणी विशेष आहों हा मनोगंड त्याच्यांत जागृत असतोच. आणि याच अहंभावाच्या कसोटीवर तो इतरांचा कस लावीत असतो. हीच गोष्ट व्यक्तिप्रमाणें समाजाची व तेथून राष्ट्राचीहि असते. जो तो आपली शेखी मिरवतो व दुसऱ्यास तुच्छ करतो. राज्य करण्यास आम्हीच पात्र आहों ही इंग्रजांची प्रौढी; खरें कल्पकराष्ट्र आमचेंच ही अमेरिकनांची शेखी वा काम्यूनिझम् हीच शाही खरी लोककल्याणकारक अशी रशियन लोकांची घमेंड, हे सारे प्रकार एकाच माळेचे मणी होत.

व्यक्तिमात्राचा व राष्ट्राचा हा अहंभाव प्रमाणांत आहे तोंपर्यंत ठीक आहे. पण तो प्रमाणाबाहेर गेला कीं, इतरांना जाचक होतो. मग शेरास सव्वाशेर निर्माण झाल्यावांचून राहात नाहीं.

इतरांना त्रासदायक न होतां व्यक्तीनें, जातीनें वा राष्ट्रानें खुशाल आत्मप्रौढी गावी. कोणी लक्ष देणार नाहीं. पण त्यांचें तें शहाणपण डोईजड झालें कीं, तें झाडून टाकण्याचा प्रसंग उद्भवतो. व्यक्तींतील भांडणें वर्गकलह, जातीजमातींचे तंटे आणि राष्ट्रांराष्ट्रंतील युद्धें यांचें मूळ कारण वरील अहंगंडांत आहे !

आपलें भिन्नत्व व श्रेष्ठत्व उठावानें दाखविण्यांत स्वतःचा उत्कर्ष असावा व इतरांचा लाभ व्हावा इतरांना निदान उपसर्ग तरी पोचूं नये एवढी दक्षता प्रत्येकानेंच घेतली पाहिजे. विशेषें करून कौटुंबिक जीवनांत पति-पत्नींनी, परस्पर-व्यवहारांत मित्रांनीं, मुलांना शिक्षण देतांना पालकांनीं व गुरूंनीं, उद्योग-धंद्यांत वाणिज्य व्यापारांत देवघेव करणाऱ्यांनीं, कारखान्यांत धनी-नोकरांनीं अथवा कोणत्याहि दोन व्यक्तींनीं संबंध

पडतांच स्नेह, प्रेम, सद्भाव व सभ्यता यांना धक्का न लागेल, याला जपलें पाहिजे. प्रत्येकानें दुसऱ्याचें मन, भावना, मतवैचित्र्य यांच्यांतील भिन्नत्वाचें स्मरण ठेऊन We must agree to differ हें तत्त्व मान्य केलें पाहिजे. तरच लोकव्यवहार सुरळीत चालेल ! नाहींतर कलह ठरलेला !

---

# प्रकरण नववें

## १

### व्यक्तिमात्रांतील अंधविश्वास !

चालू युगाला ज्ञानाचें युग म्हणून संबोधल्यास कांहींच वावगें होणार नाहीं. शास्त्रीय शोधांची पराकाष्ठा, त्यांपासून निर्माण झालेल्या सोयी व सुखें, आणि मानवजातीच्या एकंदर मनोधारणेची प्रगति यांचा विचार केल्यास चालू लेखांक बाद करावा लागेल ! अज्ञानी मनुष्य अंध-विश्वासू असेल, मान्य. पण बुद्धिप्रामाण्यवादी मनुष्य तसा कसा असूं शकेल ? आणि हें जर मान्य केलें तर व्यक्तिमात्रांत अंधविश्वास असतो असा सिद्धांत कसा काढतां येईल ?

गोष्ट खरी पण मानव स्वभावाची रचनाच अशी आहे कीं, त्यांत अंधविश्वासाचें बीज मुळचेंच आहे. आणि त्याचें प्राबल्य एवढें दांडगें आहे कीं, सर्व काळीं, सर्व देशांत प्रत्येक मनुष्य कोणत्या ना कोणत्या अंधविश्वासाला चिकटून असतो. सज्ञानी–अज्ञानी, शास्त्रीय शोधक–धर्म-भोळा, पुढारलेला–मागासलेला, प्रागतिक–सनातनी असला पंक्तिप्रपंच या सिद्धान्ताला नाहीं. मानवजातच त्यांत गुंतलेली आहे !

विधान थोडें धाडसाचें आहे, पण तें अक्षरशः खरें आहे.

## अंधविश्वास ! अंधश्रद्धा ! धर्मभोळेपणा !

नावें वेगवेगळीं. पण सर्वांचें जातक एकच. अज्ञान हें सर्वांचें जन्मस्थान. अर्थात् ज्ञानाचा चक्क प्रकाश पडलेल्या देशांतून यांची हकालपट्टी झाली असली पाहिजे यांत नवल तें काय ?—पण नवल आहे. नव्या ज्ञानयुगानें जुने अंधविश्वास नष्ट झाले असले तरी–ते सर्वतोपरी नष्ट झाले नाहींतच–त्यांच्या जागीं नव्या अंधविश्वासांनीं जन्म घेतलेला आहे ! जगांत पोकळीला नांदायला स्थान नाहीं. एक गेलें कीं त्या जागीं दुसरें यायचेंच. जंगलांत जुनी झाडें नाहींशी होत असतात; पण त्याच संधीला नव्यांचें बीजारोपण झालेलें असतें. याच नियमानें सुधारलेला मानव समाज जुन्या अंधविश्वासांतून थोडा फार मुक्त झाला आहे; पण लागलीच तो दुसऱ्या कांहीं मतमतांतरांत सांपडलेला आहे. कारण एकच–कांहीं गोष्टी अन्धविश्वासानें वा अंधश्रद्धेनें मानल्याखेरीज माणसाला आपलें जीवन सुखानें कंठतां येणार नाहीं. अंधविश्वास मनुष्यमात्रांत खिळून बसलेला आहे.

भुतेंखेतें, जारणमारण, मंत्र तंत्र, शकून अपशकू, शाप उःशाप, जादू टोणा व चेटकें या सगळ्या गोष्टी बाद होत चालल्या आहेत नव्हे ?–हो. कांहीं माणसें तसें मानूं लागलीं आहेत, इतकेंच. पण त्यांचें समूळ उच्चाटन इंग्लंड अमेरिकादि देशांतहि–आजच्या घटकेला–झालेलें नाहीं ! वर सांगितलेल्या गोष्टींना सबझूट म्हणणारीं माणसें सर्वत्र आढळूं लागलीं आहेत, हें खरें; पण तो केवळ बाहेरचा देखावा ! आंतून बहुतेक अंधविश्वासाच्या शृंखलेंत जखडलेलीं आहेत ! त्यावांचून सुधारलेल्या राष्ट्रांतून फलज्योतिषी, मान्त्रिक, जादूटोणा करणारे हे लोक आढळले नसते. इंग्लंड अमेरिकेंत अशीं कितीतरी खुळें आहेत कीं, ज्यांना आपण भारतवासी मनमोकळेपणानें हसूं.

अंधविश्वासाचें मूळ आहे अज्ञानांत. पण ज्ञानाच्या प्रकाशांत नवे अंधविश्वास, नव्या भ्रामक समजुती, नवे अनुमानधपके कसे निर्माण होतात ?--माणसाची उपजत भावनाशीलता व गतलेखाङ्कीं सांगितलेला अहंगंड होय !--गौरेतर लोक स्वराज्याला व स्वातंत्र्याला पात्र आहेत, हा विश्वासगौरकाय राष्ट्रांना पटतो का !--मुळींच नाहीं ! त्यांच्यांतील कांहीं लोक औदार्याचें सोंग आणून स्वातंत्र्य समता व बंधुता सर्वत्र पाहिजे असें तोंड भरून सांगतील; पण मनांतून व प्रसंग येतांच मतें बदलतील. कां ?--त्यांचा विश्वास कीं, गोरा लायख. काळा या बाबतींत नालायख ! हा अंधविश्वास नाहीं तर काय ?

बर्ट्रांड रसेल, हॅवलॉक एलिस, हक्स्ले, एच्. जी. वेल्स, शॉ इत्यादि मोठमोठे लोक--जाडे विद्वान्, बुद्धिप्रामाण्यवादी, सत्याचे पुरस्कर्ते, खरे ज्ञानोपासक आहेत, नव्हे ?--पण याच लोकांनीं हिंदुस्थानच्या योग्यतेचा, स्वातंत्र्याचा, दास्यविमोचनाचा प्रश्न येतांच किंवा पौर्वात्य आचारांविचारासंबंधीं चर्चेचा प्रसंग येतांच मतें फिरविली आहेत, वाटेल तीं चुकीचीं मतें प्रतिपादन केलीं आहेत, आणि अनुमानधपक्यावर निर्णय दिलेले आहेत !--कां ?--एका विशेष प्रकारच्या अंधविश्वासांत म्हणा किंवा अंधश्रद्धेंत म्हणा बुद्धि गहाण ठेवून !

जगांत कोणी कितीहि मोठा विद्वान् असो, शोधक असो, बुद्धिप्रामाण्यवादी असो, त्याच्यामध्यें कुठेंना कुठें अज्ञानाची एक बारीक रेघ असते. ती त्याला पुसून टाकतां येत नाहीं. यामुळें त्या रेघेला चिकटून असलेले अंधविश्वासहि त्याला टाळतां येत नाहींत. मनावर चुकीच्या समजुतींची पकड एवढी दांडगी असते कीं, तींतून मनुष्यमात्र सुटतच नाहीं. जे लोक स्वतःला नास्तिक, चिकित्सक बुद्धीचे व सत्यान्वेषी म्हणवतात ते सुद्धां कुठेंतरी खुळे असतात. एका विशेष आग्रहानें आपणहि अंधविश्वासाच्या तांवडींत सांपडत चाललों आहों, हेंहि त्यांच्या ध्यानीं येत नाहीं.

आपल्या इकडील भोंदू गुरूंची सांथ आणि त्यांच्या तडाक्यांत सांपडलेलीं माणसें अवलोकावीं, शहाण्या लोकाचा घोळका दिसेल. भुतें–खेतें नाहीं म्हणणारा बहाद्दर डोक्यावर प्लँचेट घेऊन नाचतांना आढळेल आणि फलज्योतिषाची टिंगल करणारा चोरून मारून हातावरील रेखा पाहात असल्याचें उमगून येईल.

याचा अर्थ असा मात्र नाहीं कीं, बद्धमूल असलेल्या अंधश्रद्धेला तशाच वाव द्यावा किंवा तिच्या आहारीं जावें तसें मुळींच नाहीं. व्यक्तींनें अज्ञान व अंधश्रद्धा यांची तीव्रता कमी करण्यास झटलेंच पाहिजे. व्यक्ति कांय किंवा राष्ट्र काय जोंपर्यंत अंधश्रद्ध आहे तोंपर्यंत त्याची म्हणावी तशी प्रगति होत नाहीं व त्याचें मनःसामर्थ्यहि वाढत नाहीं. आम्हीं भारतवासीयांनीं या गोष्टीचा विचार केला पाहिजे.

आमच्याइकडे ज्ञानाचा प्रसार ज्या झपाट्यानें व्हायला पाहिजे, तसा होत नाहीं; याचें फार मोठें कारण परसत्ता व पारतंत्र्य आहेच, पण आमच्यांतहि दोष आहेत, हें नाकारतां येत नाहीं. अमकी गोष्ट अशी कां ?—पूर्वीपासून चालत आली आहे म्हणून ! अमकें कां करायचें ? धर्मांत सांगितलें आहे म्हणून ? असें असें कां वागायचें ? बापजादे करीत आले म्हणून. असा प्रकार अद्याप चालू आहे. अद्यापि आम्ही सत्यान्वेषणास बुजतों आणि अंधश्रद्धेची शृंखला तोडूं इच्छित नाहीं !—आम्हीं विचार केला पाहिजे. नवा काल ओळखून काजळी झाडली पाहिजे. याकरितां धर्म, संस्कृति व स्वत्व यांवर घाव घातले पाहिजेत असें नाहीं. रूढीचें प्राबल्य कमी करून अंधश्रद्धेला घालतां येईल तेवढा आळा घातला पाहिजे.

याला उपाय, सत्यान्वेषणाला न डावलतां प्रत्येक विषयाच्या बऱ्या-वाईट अशा दोन्ही बाजू पाहावयाच्या आणि समतोलमनानें विचार करा-

वयाचा. एकदम हें साधारण नाहीं. भावना वरचेवर दुखावतील. पण निरुपायानें तेवढी कळ सहन करून पुढें सरलें पाहिजे.

## २

### प्रत्येकांत विचारप्रवणता आहे.

मथळा वाचतांच पुष्कळ वाचकांना हंसूं येईल. माणसांत विकारांचें प्राबल्य असल्याचें सांगितलें, पटलें. माणूस भावनाविवश व अज्ञानी असल्यामुळें अंधविश्वासू आहे हेंहि पटलें. पण त्याच माणसांत पुन्हा विचारप्रवणता आहे; हें कसें मान्य करावयाचें ? अगदींच विरोध नाहीं का या सांगण्यांत ?—निःसंशय. पण वर जें विधान केलें आहे तेंहि कांहीं-तरी नव्हे. मानवस्वभावांत विचारप्रवणता हाहि गुण उपजत आहे, यांत काडीमात्र शंका नाहीं.

अगदीं उथळ दृष्टीनें जगाच्या घडामोडींकडे पाहिलें तरी असें दिसून येतें कीं, दोन अगदीं परस्पर विरोधी गुण तींत सामावलेले आहेत. दिवस-रात्र, अंधार-प्रकाश, जनन-मरण, उन्नति-अवनति, दऱ्याखोरीं-पर्वत अशा जोड्या सर्वत्र आढळतात ! मानवप्राणी यांतच जमा. त्याचें जीवन द्वैतमय आहे. तसाच त्याच्या स्वभावांत परस्परविरोधी गुणांचा समावेश झालेला आहे.

खगोलाची अनंतता सर्वमान्य आहेच. या विराट् स्वरूपांतहि दोन विरुद्ध गुणांची रस्सीखेंच चालूं असल्याचें खगोलशास्त्रज्ञ सांगतात. हे दोन गुण म्हणजे centrifugal = केंद्रांतून बाहेर पसरणें, व centripetal = बाहेरून केंद्राकडे जाणें, हे होत.

विचित्र प्रकार आहे हा. पण तो अक्षरशः खरा आहे. पुढील पानावरील आकृति पहा. कांहीं कल्पना येईल.

१–केंद्रांतून बाहेर.



२–बाहेरून केंद्राकडे.



डावीकडचें वर्तुळ बाहेर प्रसरण पावते आहे. शांत पाणी असलेल्या तलावांत बारीकसा धोंडा टाकल्यास लाटांची वर्तुळें उठूं लागतात आणि तीं पसरत जातात. याच पद्धतीनें कांहीं लाटा केंद्राकडेहि येतात. अखिल ब्रह्मांडांत या दोन अवस्था चालू आहेत ! आकाशांत दिसणारे सूर्य चंद्रादि गोल व इतर लहान मोठें तारे एकमेकांच्या आकर्षणांत धांवत आहेत, हें जितकें खरें, तितकेंच, ते परस्परांपासून दूर पळण्याची शर्यतहि खेळत आहेत, हेंहि खरें ! यामुळें विश्वाचा अत्यंत प्रचंड गोल आकसत शून्यांत येणार कीं, रबरी फुग्याप्रमाणें सारखा प्रसरण पावत अनंतांत विलीन होणार याचें निश्चित उत्तर शास्त्रज्ञांना अद्याप सापडलेलें नाहीं.

वरील प्रकार कांहींहि असो. मानवस्वभावापुरतें पाहावयाचें झाल्यास त्यांतहि परस्परविरोधी गुणांची ओढाताण चालू असल्याचें दिसेल. यामुळेंच मनुष्यमात्र प्रेमळ वा दुष्ट, शूर वा भ्याड, परोपकारी वा स्वार्थी अशा द्विविध रूपाचें असूं शकतें.

याच नियमानुसार मनुष्यमात्रांत विकारांचें जेवढें प्राबल्य आहे, तेवढ्याच प्रमाणांत त्याच्याठायीं विचारप्रवणताहि आहे. माणूस विकारी व विचारी आहे यामुळेंच. हे परस्परविरोधी गुण अंधार-प्रकाशाप्रमाणें एक-

मेकांचे पूरक आहेत. केवळ विकारी किंवा केवळ विचारी व्यक्ति आपलें जीवन सुखरूपतेनें जगूंच शकत नाहीं !

या दृष्टीनें शेक्सपीअरचीं नाटकें—हॅम्लेट व अथेल्लो पुनःपुन्हां विचार करीत वाचण्यासारखीं आहेत ! हॅम्लेट अत्यंत विचारी तर अथेल्लो अत्यंत विकारीं ! पहिल्याला विचाराची तड लावतां येईना. दुसऱ्याला विकारवशता तोडतां येईना. दोघांचा परिणाम झाला मृत्यूंत ! कोणतेंहि एक टोंक असेंच मारक आहे.

* * *

बींजामध्यें जसा अंकुर तसा माणसाच्या विकाराच्या पोटांतच विचाराची स्थापना आहे. विचार फोफावूं लागला कीं विकारांचा उपशम आपोआपच होऊं लागतो. मानवजातींची आजची सुधारणा म्हणजे विकारांतूनच विचार आणि विचारांतूनच विकास या क्रमानें आहे. तेव्हां प्रक्षोभक अशा विकारांच्या वावटळींतून नाना प्रकारचे विचार निर्माण तरी कसे होतात, याचा शोध घेऊं.

विकारांतून विचार बाहेर पडणें म्हणजे कच्च्या मालापासून पक्का माल तयार होणें, यासारखा प्रकार होय. कापडाची गिरणी बहुतेकांच्या पाहाण्यांत आलेली असते. या असल्या कारखान्यांत एकीकडून कापसासारखा कच्चा माल आंत येत राहातो. नंतर त्यावर कांहीं संस्कार होऊन, त्यांचें रूपांतर कापडासारख्या पक्क्या मालांत होतें. अशीच कांहीं क्रिया विकारांतून विचार निर्माण होण्याची आहे.

माणसाचें शरीर, पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें, मन आणि बुद्धि असा मोठा कारखाना आहे. स्वतःच्या सुखाची अपेक्षा ही बलवत्तर प्रेरणा माणसाच्या मनांत प्रामुख्यानें वावरत असते व तिच्याच दोसणीनें कार्याला प्रारंभ होतो. डोळे, नाक, कान इत्यादि ज्ञानेंद्रियें मोठ्या तत्परतेनें भोंवतालच्या सृष्ट पदार्थांची माहिती मेंदूला पुरवीत असतात. पाहणें, अनुमान

करणें व तुलणें या क्रिया विद्युत्गतीनें घडतात आणि नंतर त्यांची जी कांहीं विल्हेवाट होते त्या भानगडीचें नांव विचार !

विकारांतून विचारांचे अंकुर फुटतात ते या पद्धतीनें. आधीं स्वार्थ. स्वतःचें सुख, स्वतःचें स्वास्थ्य. मी जिवंत कसा राहीन ? सुखी कसा होईन ? सुरक्षित कसा राहीन ? या प्रश्नांच्या भोंवतीं माणसाचे विचार फिरत राहतात आणि मग यांतूनच माझें कुटुंब, माझें कुल, माझी जात, माझा समाज व माझें राष्ट्र अशा पायऱ्यांनीं त्याच्या विचारांचें वर्तुल वाढत जातें. म्हणजे, स्वसुखाच्या केंद्राभोंवतीं सारा पसारा मात्र या घटनेंतहि व्यक्तिमात्राचें भिन्नत्व अंशभागी असतें. जशी ज्याची प्रकृति तसे त्याचे विकार व विचार.

एक उदाहरण घेऊं. समजा एक चांगल्यापैकीं सोन्याचें घड्याळ अनेक माणसांनीं एकाच वेळीं पाहिलें. या जमावांत एक रानटी, एक चोर, एक दरिद्री सज्जन, एक श्रीमान्, एक कल्पक, अशा धर्तीचीं वेगवेगळ्या परिस्थितीचीं वा प्रकृतीचीं माणसें आहेत. या सर्वांनीं वस्तू पाहिली एकच, पण प्रत्येकाचा त्या वस्तूविषयींचा विचार निरनिराळा राहील. ज्याला घड्याळाचें महत्त्व माहीतच नाहीं, अशा रानटी मनुष्याला काय वाटेल ? घड्याळाचें सौंदर्य कदाचित त्यास प्रतीत होईल; त्याच्या बाह्यरूपाचें टिक टिक आवाजाचें नवल वाटेल; पण आपल्याला तें हवें असें कांहीं त्यास वाटणार नाहीं. पण याच्या उलट ज्याला त्याचा उपयोग माहीत आहे, अशा चोराला ते उपटण्याची इच्छा होईल तर त्याच वेळीं श्रीमान् मनांत विचार करीलः बस्स् ! विकत मिळाल्यास घ्यावयाचें ! सज्जन आपलें दारिद्र्य आठवून—आवश्यकता असतांहि तें अप्राप्य मानून तेथून खिन्नतेनें चालता होईल, तर कल्पकाला त्या घड्याळाची आंतील रचना पाहाण्याची उत्कंठा लागेल. तात्पर्य, मनुष्यमात्रांत आढळणाऱ्या विचारांचें वैचित्र्य या पद्धतीचें आहे. जगाकडे पाहाण्याची, त्यांतील पदार्थमात्रापासून मिळ-

णाऱ्या सुखदुःखांची, आणि त्यांच्या अनुषंगानें स्वतःचें हवें–नको ठरविण्याची पात्रता माणसांच्या अंगीं ज्या पातळीवर असेल, त्याच पातळींत त्याची बुद्धि व विचारशक्ति काम करूं लागते. मग तदनुरूप त्याचें जीवन बनत जातें.

विकारांमध्यें एकदम धडक मारण्याचें, झटकन् कार्य उरकण्याचें आणि परिणामाविषयीं बेफिकीर राहाण्याचें सामर्थ्य आहे. पण तें अकालीं व अस्थानीं वायां जाऊं द्यावयाचें नसेल तर विचारांचा संयम त्यांना हवा. अनुभव घेत, तरतमभावानें विचार करीत आणि पुढील कालाचें धोरण राखीत विकारांना राबवून घेणारा मनुष्य पावलागणिक सुबुद्ध, समधात व समंजस होत जातो. त्या बरोबर त्याच्या विचारशक्तीला प्रखरता येऊं लागते. मग त्याला आपसूखच प्रभावी, प्रोत्साहक, गतिमान् व निःस्वार्थी विचार सुचूं लागतात. इतरांच्या कळपांतून तो आपण होऊन बाहेर पडतो.

स्वावलंबी व स्वतंत्र असे नवे विचार माणसाचें फारच मोठें सामर्थ्य होय. तें ज्याचें वाढत गेलें, तो मग जगाची वा सामान्य सुखदुःखांची पर्वा करीत नाहीं. त्याची अनुकरणशीलता मंद होत जाते. गतानुगतिकत्वाचा त्याला उबग येतो. यामुळें तो आपल्या चालीनें चालणारा, एकान्तिक व कणखर वृत्तीचा होत जातो. अर्थात्च त्याची ही वेगळी वाट ठराविक चाकोरींतून चाललेल्या माणसांना सुतराम् पटत नाहीं ! मग त्याचे अभिनव विचार त्यांना धोक्याचें वाटल्यास नवल तें काय ?—स्वार्थविरहित विचारहि सर्वसामान्य जनतेला आवडत नाहींत, हा एक मानव स्वभावांतील विलक्षण प्रकार आहे ! आश्चर्य खरेंच; पण समंजस, सामर्थ्यसंपन्न, प्रागतिक व संकट विमोचक विचार करणें, ते बोलून दाखविणें आणि त्याप्रमाणें वागण्यास झटणें हा समाजांत साभावून जाण्याचा गुण नव्हे; भिन्न होण्याचा, अडथळे भोगण्याचा, छळ सोसण्याचा अथवा उपहासपात्र बनण्याचा आहे !

अलौकिक आचारांविचारांचीं माणसें निःस्वार्थीपणानें भोंवतालच्या जगाच्या उपयोगीं पडण्यास, त्यांना नवा सुखाचा मार्ग दाखविण्यास व त्यांचा उद्धार करण्यास कितीहि झटोत व त्यांचा प्रामाणिक प्रयत्न कितीहि निरपवाद असो. जग त्यांची एकदम किंमत करण्यास धजत नाहीं. उलट, हा मनुष्य मोठा उपद्व्यापी आहे असें त्यांस वाटतें. विशेषें करून अत्यंत जुलमी अशी राजसत्ता आणि प्रतिगामी स्वरूपाची धर्मसत्ता या असल्या क्रांतिकारक मनुष्याला भयानक समजून तो व त्याचे विचार गाडले जातील असाच त्यांचा प्रयत्न असतो ! जगाच्या इतिहासांत अशा प्रकारचीं उदाहरणें विपुल आहेत. अखिल मानवांच्या उद्धारार्थ तळमळणाऱ्या महात्म्याचें पहिलें पारितोषिक सुळावर जाणें !

पण एवढ्यानें विचार मरतात का ? माणसाला माणूस नाहींसा करूं शकतो. विचारांना नाहीं ! प्रभावी, स्वतंत्र, स्वयंगतिक प्रभावी विचार अमर असतात ! ते अल्पावधींत त्यांच्या आड येणाऱ्या सत्तेलाच खाऊन टाकतात ! कोणत्याहि राष्ट्राच्या इतिहासाचीं पानें उघडा. अनेक राजे महाराजे, धर्मगुरू, सत्ताधीश, उन्मत्त अधिकारी, बेगुमान दुरात्मे यांनीं आपआपल्या चढत्या कालांत स्वतंत्र विचारी लोकांचा, प्रतिभासंपन्न विचारांचा आणि लोकोपकारक कल्पनांचा विलक्षण छळ करून त्यांच्या प्रवर्तकांना ठेंचण्याचा भयंकर अट्टाहास केला ! —परिणाम काय झाला ?— ते ते दुरात्मे काळीं तोंडें करून नामशेष झाले ? विचार जिवंत राहिले आणि त्यांच्या कर्त्यांचीं स्मारकें उभवलीं गेलीं !-- विचार असे आहेत ! पुढें पुढें सरण्याची, ठेंचले असतां जोमानें वर उसळण्याची, तोडले असतां अनेक शाखांनीं पसरण्याची आणि विटंबना केली असतां जास्त तेजस्वी होण्याची प्रचंड शक्ति विचारांत सांठविलेली आहे !—मानवजातीचें आजचें सारें वैभव, सारें श्रेय, कांहीं थोड्या अवतारी पुरुषांच्या विचारशक्तीचा विजय आहे !

असली ही विचारशक्ति मनुष्यमात्रांत वाटली गेली आहे. ती उसळून वर आल्यावर तिला खालीं दाबण्यांत वा आडवून धरण्यांत कोणाचेंच हित नसतें ! तिचा कालवा काढून मार्ग दिला पाहिजे, किंवा यंत्रबद्ध करून शक्ति निर्माण केली पाहिजे. नाहींतर ती बांध फोडून अनर्थ करणार हें निश्चित.

---

## प्रकरण दहावें

### १

### मनुष्यमात्र संवयींनी बद्ध आहे.

होय ! आपण सारीं माणसें जडलेल्या नानाविध संवयींचे पुरे दास आहोंत. ज्याला कसलीच संवय नाहीं, असा मनुष्य भूतलावर तरी आढळणार नाहीं. कारण, जीवन जगणें म्हणजेच माणसाला असलेल्या बऱ्यावाईट संवयीची मालिका तयार होणें. ही गोष्ट चटकन् मनांत भरण्यासारखी नाहीं. आपण आपल्या संवयींशीं इतके एकरूप झालेले असतों कीं, त्यांचं अस्तित्व आपल्या ध्यानांत येतच नाहीं. पण एवढें निश्चित— आपल्या संवयींचा प्रभाव आपल्या सबंध आयुष्यावर पडलेला असतो. त्याचे बरेवाईट परिणामहि आपणास सदैव अनुभवावे लागतात.

संवय—चांगली, वाईट वा सामान्य—कशीहि असो, तिची पकड मनुष्याच्या मनावर एवढी दांडगी असते कीं, चमत्कारच वाटावा. याविषयीं स्वामी रामकृष्ण परमहंसांच्या उपदेशामृतांतील एक चुटका ऐकण्यासारखा आहे.

एकदां कोळ्याच्या दोन बाया मासे विकण्यास म्हणून बाजारांत आल्या. त्यांची विक्री होण्यास दुपार झाली. पण तो सौदा आटोपल्यावर

रिकाम्या पाट्या डोक्यास अडकवून त्या परत निघाल्या. दुपारची वेळ. उन्हाचा ताप होऊं लागला. कुठें तरी थोडी विश्रांति घेऊन मग पुन्हा गांवच्या वाटेला लागावें, असा त्यांनीं विचार केला. त्यांच्या मार्गावरच एक मोठी फुलबाग होती. तींत त्या शिरल्या व आडोश्याला गारशी छाया बघून, त्यांनीं पथारी पसरली. दाट छायेमुळें त्या स्थानीं गारवा छान होता व आसपास फुललेल्या फुलांचा मधुर गन्ध सर्वत्र दरवळलेला होता. दुसऱ्या एखाद्याला त्या स्थानीं सहज डोळा लागला असता; पण माश्यांचा उग्र गन्ध नेहमीं अनुभवून त्यालाच लुब्ध होणाऱ्या त्या बाया पुष्पगन्धानें एकदम उबगल्या ! त्यांना तो मधुर गंध सहनच होईना ! तेव्हां त्यांनीं माश्यांच्या वासानें घाण झालेल्या आपल्या पाट्या, तोंडावर झांकून घेतल्या व फुलांच्या वासाला शह दिला ! आणि मग त्यांना झोंप आली !—काय कारण !—त्यांच्या नाकाला झालेल्या माश्यांच्या घाणीची संवय. यामुळें त्यांना फुलांचा सुगन्धहि मानवेना !

संवयीचा परिणाम हा असा आहे.

संवय जडते कशानें ?—संगतीनें नव्हे का ?—आणि संगतींत काय घडतें ?—अनुकरण ! मी दुसऱ्याचें, व दुसरा माझें अनुकरण करीत असतो !—हा प्रकार कां व कसा घडतो, याचें विवेचन आपण मागच्या एका स्वतंत्र लेखांत केलेंच आहे. यावरून मनुष्यस्वभावात अनुकरण-प्रियता ही पहिली पायरी आणि तिच्यांतून निर्माण झालेली संवय ही दुसरी पायरी, असें आपोआपच सिद्ध होतें.

पहिल्यांदा अनुकरण आणि तिचेंच रूपान्तर संवय अगदीं बाळपणा-पासूनचें आपलें जीवन पाहावें. समजूं लागल्यापासूनच कोणतेंहि मूल आपल्या आईबापाचें वा भावंडाचें अनुकरण करीत असतें. खाणेंपिणें,

हंसणें रडणें, खेळणें, रागावणें इत्यादि सर्व क्रिया अनुकरणानें प्रथम मूल करूं लागतें, आणि त्यांचीच आवृत्ति पुनः पुन्हा केल्यानें त्याला त्या संवयी जडतात !—सबंध आयुष्यभर आपण याच मार्गानें जातों. पहाटे उठून दूर फिरण्यास जाणें आरोग्यप्रद आहे असें आपण कोणाकडून तरी शिकतों, आणि ती गोष्ट मनांत ठसल्यास तिची आपण संवय लावून घेतों. वाच-नाचा नाद, खेळ खेळण्याचा नाद किंवा बिडीचें व्यसन, दारूबाजी इत्यादि बऱ्यावाईट संवयी माणसाला जडतात दुसऱ्याचें पाहून, व वरचेवर तीच ती गोष्ट आचरून !

अनुकरण व संवय यांचा संबंध निकट असल्यामुळें त्यांच्यांत कांहीं साम्य आहे; पण एक महत्त्वाचा विरोधहि आहे. अनुकरणांत मनुष्य दुसऱ्याच्या चालीनें चालतो. पण संवयींत वा व्यसनात तो स्वतःचेंच अनु-करण वरचेवर करितो. एक गोष्ट एकाच पद्धतीनें वरचेवर करीत राहिल्यानें माणसाच्या ती इतकी अंगभूत होते कीं, पुढें कांहीं काळ ती यांत्रिक गतीनें आणि नंतर अगदीं भान रहित राहून तो आपल्या त्या त्या क्रिया करू शकतो. रोजच्या मार्गावरून जातां येतां माणसांचें मन चालण्याच्या गतीकडे वा कृतीकडे कोठवर असतें, याचा अनुभव प्रत्येकास आहेच.

संवयीचा प्रताप फार दांडगा आहे. ती एकदां अंगीं खिळली म्हणजे उपजत स्वभावाप्रमाणें माणसाशीं एकरूप होते. मग तिचा प्रकार चांगला, वाईट, टाकाऊ, सामान्य—कसाही असो. वाचनप्रियता व दारूचें व्यसन या दोन्ही गोष्टी चांगल्या—वाईटाचीं दोन टोकें आहेत; पण त्यांची उत्पत्ति मात्र झाली संवयीच्या पोटीं.

संवय हा एक डांबून ठेवणारा हटवादी गुण आहे पण तेवढ्यानें ही काढून टाकणें किंवा टाळणें आपल्या हातांत नाहीं, आणि तसा कांहीं प्रयत्न केलाच तर तो अयशस्वी होईल. स्वभाव बनण्यास अपाय होईल.

दोन विटांच्या थरांतील चुना जें सांधण्याचें कार्य करितो, तेंच संवय दोन समान कृतींना सांधण्याचें व बळकटी आणण्याचें कार्य करिते. संवयीमुळें कार्याला व गुणाला रूप येत जातें ! विद्याभ्यासांतील यश कशांत आहे ? कलावंताचें चातुर्य कशानें प्रगट होतें ! धिमेपणानें तीच तीच गोष्ट करीत राहिल्यानेंच नाहीं का ?—तपस्या, अभ्यास, सराव याचा अर्थ म्हणजे संवय लागून घेणेंच नाहीं का ?—कोणताहि सद्गुण, कोणतेंहि हस्त-कौशल्य कोणताहि व्यवसाय सिद्ध व्हायचा असेल. त्यात माणसाला निष्णात व्हावयाचें असेल तर ?—त्यानें त्या त्या गोष्टीची संवयच जडवून घेतली पाहिजे.

मात्र संवयीच्या आहारीं किती जावयाचें, याचा तोल राखला पाहिजे. फेरबद्दल हा संवयीचा प्रतिस्पर्धी होय. पण त्याच्यावरहि लक्ष ठेवण्यास हवें. संवय हें सांठलेलें पाणी व फेरबद्दल हा प्रवाह; पण दोहोंत ताळमेळ हवा. सांचलेलें पाणी वाईट होऊं लागतें. धावतें पाणी उगीच वाहूं दिल्यास ऐन वेळीं सांटा कोरडा ठणठणीत व्हायचा. संवयीनें मनुष्य बद्ध होतो. फेरबदलानें त्यास स्वतंत्र हालचाल करणें सुलभ होतें. मानवी प्रगतीला दोही गुणाची आवश्यकता आहे.

संवयीनें अत्यंत बद्ध होऊन विमूढ होणें जितकें वाईट, तितकेंच स्वभावांत, मनांत, आचारविचारात संस्कारांत आणि मतमतांतरांत सारखा फेरपालट करणें वाईट. म्हणजे हटवादीपणा व चंचलपणा या दोन्ही टोंकांना खपलें पाहिजे. संवयीनें कालचें कार्य आज सुलभ होतें तर तेंच कार्य करण्याची पद्धत बदल्यास त्यांत नवीनपणा येतो. या दोन्ही योग्य गोष्टी प्रमाणांत मिसळून कार्य करीत राहिल्यास मनुष्याच्या श्रमांची, विचाराची, वेळेची व इच्छाशक्तीची बचत होते आणि त्याची कार्य उरकण्याची शक्ति वाढत जाते यांत शंका नाहीं.

रुळलेल्या मार्गानें जाणें सोपें असतें. कां ? संवयीमुळें.

नवा मार्ग आंखणें कठिण वाटतें. कां ? संवय नसल्यामुळें.

व्यक्तीप्रमाणेंच कुटुंब, समाज, राष्ट्र यांनाहि संवयी व तिच्या संबंधींचे नियम लागू आहेत. नवे आचार–विचार स्वीकारतांना समाजाला व राष्ट्राला असेंच बुजल्याप्रमाणें होतें. धर्म. नीति, परंपरा यांच्यांत संवय आणि फेरबद्दल यांचें प्रमाण चुकलें कीं गाडें घसरलें !

चरखासंघाचीच चळवळ घ्या. महात्माजींनीं ही चळवळ शंभर वर्षांपूर्वी चालू केली असती तर ? समाजाला कांहींच चमत्कारिक वाटलें नसतें. कारण, त्यावेळीं खेडोगाडीं व घरटीं चरख्यावर सूत काढण्याचें कार्य चालू होतें. आज या साध्या गोष्टीकरितां आटापिटा करून समाजाच्या गळीं ती गोष्ट उतरवावी लागत आहे. सूत कांतण्याची देशाची संवय मोडली हेंच कारण नव्हे का ?—स्वराज्य व स्वातंत्र्य या विषयींहि आमची संवय मोडल्यामुळें आम्ही नादान झालों आहों, हें काय सांगायला पाहिजे ?

या स्थानीं मानव स्वभावांतील दोन गतींचा प्रकार ध्यानांत घेण्यास हवा. मागें केंद्रोत्सर्गी व केंद्रवर्ती अशीं दोन वर्तुळें दिलीं आहेत. केंद्रांतून बाहेर जाणें हा एक प्रकार, व केंद्राकडे येणें हा दुसरा प्रकार. म्हणजे विकर्षण व आकर्षण म्हणा किंवा देणें आणि घेणें म्हणा. अनुकरण करणें हा घेण्याचा प्रकार. विचार करणें हा देण्याचा प्रकार. देण्यापेक्षां घेणें माणसाला सुलभ वाटतें. म्हणून अनुकरण करणें–संवय लावून घेणें सोपें जातें. स्वतंत्र विचार करणें व नवा मार्ग काढणें या गोष्टी कठिण आहेत. यामुळेंच विचारी माणसें थोडीं. पुढारी एखादाच असतो.

विकारां विचारांचा झगडा असाच चालतो. विकारी माणूस फक्त केंद्रवर्ती असतो, याला जगापेक्षां स्वतःचें चटकन् समजतें. विचारी बाहेरचा विचार आधीं करितो. अशा या उलट सुलट गतींतून मानव स्वभाव जात असतो.

## २

**वस्तुमात्रास स्थित्यंतर आहे;**
**मनुष्याला तर आहेच आहे !**

स्थित्यंतर, सारखा फेरपालट हा निसर्गाचाच प्रमुख गुण आहे. मनुष्यमात्र या चक्रातून कसा सुटेल ?

विश्वाच्या अफाट संसारांत अशी एकहि जड वा चैतन्यमय वस्तु नाहीं कीं, जिच्यामध्यें प्रत्येक क्षणाला कांहींना कांहीं फेरबदल होत नाहीं. गोचर–अगोचर रीतीनें चक्रनेमिक्रम चालू आहे !

मनुष्यप्राणी हा एक त्यांतील क्षुल्लक घटक, त्याची इच्छा असो वा नसो, कालाची अनुकूलता असो नसो, वा परिस्थिति बिघडलेली असो; फेरबदल त्याला चुकलेला नाहीं—कोणालाच चुकलेला नाहीं. सूर्य, चंद्र, तारे, पृथ्वी, पर्वत, नद्या, पशुपक्षी, झाडें, फुलें, सर्वांच्यावरून स्थित्यंतराचा हात फिरतो आहे. आतांच्या क्षणीं असणारी ती ती वस्तु पुढच्या क्षणीं तशीच असत नाहीं. ती सारखी बदलत राहाते.

स्वतःच्या देहाकडे पाहा. केवढी क्रांति चाललेली असते! आधीं जन्म, त्यांतून बालपण, त्यांतून किशोरावस्था, मग तारुण्य, मग प्रौढावस्था, मग म्हातारपण आणि मग मृत्यू! कोणत्याहि दोन अवस्थांत स्थिरता म्हणून नाहीं. मृत्यूमध्येंसुद्धां पूर्णविराम नाहीं. वाचीत असलेलें पुस्तक पाहा. छापील कागद दिसतो, नव्हे ?—पण एकेकाळीं तो होता, गवत, झाड, पालापाचोळा ! बरें, हें पुस्तक जाळून टाकलें तर ?—त्याची होईल राख ! म्हणजे त्याच्या रूपांत फरक पडला !—नाश म्हणजे नवी अवस्था ! वस्तुमात्रास हा नियम लागू आहे. विश्वांत सारखी क्रांति सुरू आहे.

फेरबदलाच्या या विश्वव्यापी चक्रांतून कोणत्याहि माणसाची समाजाची वा राष्ट्राची सुटका नाहीं. मग कोणी सबळ असोत वा कोणी

दुर्बल असोत ! हट्टवादीपणानें, निग्रहानें, अज्ञानानें किंवा जाणून बुजून कोणी या क्रांतीच्या आड येईल तर, तर त्याचा चुगडा होईल ! व्यक्तीनें स्वतःला चिरंजीव समजावें, एका राष्ट्रानें सत्तेच्या मदांत दुसऱ्या राष्ट्राला खुशाल तुडवावें, आणि पददलितांच्या भाग्याचीं सूत्रें आमच्या हातीं म्हणून शेखी मिरवावी !—क्रांति कोणाला भीत नाहीं. कोणाच्या अडव णुकीनें अडत नाहीं. ती सारखी गतिमान् आहे !—ती वस्तुमात्रास अपरिहार्य आहे.

अशा स्थितींत गतकालाचा शोक करण्यांत अर्थ काय ? नवा काल आला म्हणून आश्चर्यमूढ होण्यांत लाभ काय ?—तसें होणारच होतें.

नव्या कालानें नवी परिस्थिति प्राप्त होणार आणि तिच्या अनुषंगानें नवीन पिढी, नवे आचारविचार नवीं मतें आणि नवा धर्म येणारच येणार. मग त्यापासून त्रास करून घेण्यांत स्वारस्य काय ? नदीपार व्हायचें झाल्यास, पोहून वा वस्त्रें न भिजवतां नावेंतून पैलतीर गांठलें पाहिजे. दुसरा उपाय नाहीं.

हिमालयाच्या शिखरावरून खालच्या प्रदेशांत वाहात येणाऱ्या नद-नद्यांना विलक्षण सामर्थ्य असतें. हत्तीसारखे शिलाखंडसुद्धां ढकलींत खालीं नेण्याचें काम ते प्रवाह सहज लीलेनें करितात ! चतुर व कल्पक माणूस या सामर्थ्याला भिऊन गप्प बसला का ?— नाहीं. त्यानें हिमालयाच्या कुशींत असलेल्या अरण्यांतील मोठमोठे वृक्ष तोडले आणि ते दिले या प्रवाहांत टाकून ! जे अजस्र ओंडके वाहाण्यास हत्ती अपुरे पडले असते ते माणसानें जलप्रवाहाकडून खालपर्यंत—आपल्याला इष्ट अशा स्थलीं—आणिले ! क्रांतीचा प्रवाह अशाच सामर्थ्याचा आहे. त्या सामर्थ्याचा उपयोग व्यक्तीनें, समाजानें, राष्ट्रानें करून घेतला पाहिजे.

क्रांतीमध्यें विकर्षणाचा—केंद्रांतून बाहेर पसरण्याचा–गुण आहे. आणि म्हणूनच तिचें साम्य माणसाच्या विचारप्रवणतेशीं आहे. विचार

निर्माण झाले कीं माणसाला ते बाहेर टाकावेसें वाटतात!—क्रांति त्याच्या पुढची पायरी होय. अनुकरणप्रियतेचें रूपान्तर संवर्धीत होतें. तसें विचाराचें रूपान्तर क्रांतींत, कांहींतरी कृतींत होतें. अर्थात् क्रांति बरी किंवा वाईट होणें हें विचारांच्या बरेवाईटपणावर अवलंबून आहे, हें स्पष्ट आहे. विचार सामर्थ्यसंपन्न, हितप्रद, लाभदायक असतील तर त्यांतून निर्माण होणारी ती क्रांतीहि त्याच रूपाची असेल. पददलित राष्ट्रानें या वस्तुस्थितीचा विचार अवश्य करावा.

विश्वाच्या अफाट पसाऱ्यांत चाललेलें स्थित्यंतर एवढें एचंड आहे कीं, त्यांत व्यक्तीगणिक होणारा फेरबदल म्हणजे दर्यामें खसखस! यामुळेंच भविष्यकालावर माणसाची हुकमत म्हणावी तशी चालत नाहीं. त्याला परिस्थितीच्या हातांतील बाहुलें बनणें भाग असतें. पण याचा अर्थ माणसानें हताश होऊन कांहीं करूं नये, केवळ प्रवाहपतित व्हावें, आणि लाकडाच्या ओंडक्यांप्रमाणें वाकडे-तिकडे टक्के खात कोठेंहि जावें, असा होत नाहीं. भावी कालावर दृष्टि ठेवून, वर्तमानकालीं मिळणाऱ्या संधींचा जास्तींत जास्त उपयोग करून घेणें व त्याकरितां भरपूर प्रयत्न करणें माणसाच्या हातीं आहे. महाभारताची शिकवण आहे.

पूर्वे पयासि तत्कुर्याद्येन वृद्धः सुखं वसेत्।

" पूर्ववयांत असेंच वागावें कीं जेणेंकरून वृद्धापकाळ सुखांत जाईल." यावरून आधीं योग्य वर्तन केल्यास पुढच्या काळांत योग्य फळ मिळविण्यास आपण पात्र होतों, असें मानण्यास हरकत कोणती?

पण समजा, स्थित्यंतराच्या नियमाप्रमाणें माणसानें पुढें सरण्याचा प्रयत्न केला नाहीं तर?—परागति पत्करावी लागते! जगरहाटी तुम्हांला गप्प बसूं देणार नाहीं. वर चढण्याविषयीं उदासीनता दर्शविली कीं, फेरबदल सांगतो—सरका खालीं. म्हणजे तो खालीं ढकलतोच! म्हणून ' जगण्याच्या योग्यतेचा असेल तो जगेल,' असें म्हटलें जातें, आणि

त्याचा अनुभवहि पण येतो. कोणत्याहि समाजाचा वा राष्ट्राचा मागील इतिहास पाहावा. अति वैभवानें आळस, आळसांतून आहे ते ठीक आहे अशी वृत्ति, या वृत्तीमुळें क्रांतीकडे दुर्लक्ष आणि या दुर्लक्षामुळें परागति असें चक्र फिरत राहिल्याचें दिसून येतें.

उत्पत्ति, स्थिति आणि लय या चक्राकार गतीनें जगाचें कार्य चाललें आहे. जनन आहे त्याला मरण टळत नाहीं हेंहि खोटें नाहीं; पण तेवढ्यामुळें प्राप्त परिस्थितीकडे डोळेझांक करणें हिताचें होत नाहीं. विश्वव्यापी क्रांतीमध्यें व्यक्तिमात्राचें स्थित्यंतर ही अगदीं क्षुल्लक गोष्ट आहे यांत शंका नाहीं; पण 'मी कोणीतरी आहें आणि मला जगलें पाहिजे. केवळ कसें तरी नव्हे तर सुखानें, सन्मानानें, सामर्थ्यानें, समाधानानें जगलें पाहिजे,' याची जाणीव व्यक्तीनें ठेवण्यास हवी. तसा प्रयत्नहि करण्यास हवा.

व्यक्तिमात्रांतील विचारप्रवणता त्याकरितां आहे, विकारप्राबल्य त्याकरितां आहे. संवयी त्याकरितां आहेत. या सर्वांचा उपयोग विश्वव्यापी स्थित्यंतर स्वतःच्या अस्तित्वाला अनुकूल होईल याकडे करण्यांत माणसाची खरी कर्तबगारी आहे.

---

# प्रकरण अकरावें

## १

### व्यक्तिमात्रास स्तुति-निंदेची जरूर आहे

स्तुति किंवा निंदा ! पहिल्या गोष्टीची सर्वांस आवड तर दुसरी कोणालाहि नको ! पहिली सर्वांना मोहक वाटते तर दुसरीला प्रत्येक बिचकत असतो ! पहिलीची सर्व सत्ता आपल्याकडे असण्याबद्दल जो तो

घडपडत असतो तर दुसरीला कोणीहि कोणाच्या गळ्यांत अडकविण्यास नेहमीं तयार असतो ! वास्तविक मनुष्यजीवन सुखमय होण्यास या दोन्ही गोष्टींची ( स्तुतीची व निंदेची ) आवश्यकता आहे.

मनुष्यास उत्कर्षास पोंचविण्यास स्तुतीहि कारण होईल आणि निंदाहि ! मनुष्यास पशूहूनहि नीच करण्यास स्तुतीहि उपयोगी पडेल व निंदाहि !

या दोन्ही गोष्टी अमृताप्रमाणें आहेत व विषाप्रमाणेंहि आहेत. उपयोग करणारांवर व करून घेणारावर त्यांचा चांगलेवाईटपणा अवलंबून आहे. दूध चांगलें खरें; पण तें प्रत्येक व्यक्तीस आरोग्यदायक व बलकारक होईलच असा जसा नियम नाहीं, तसेंच स्तुति-निंदेचें आहे; अनुपान योग्य पाहिजे.

तेव्हां आतां प्रथमतः स्तुतिविषयीं विचार करूं.

स्तुति सर्वांना हवी. ती अशी मोहक आहे कीं, ती यच्चयावत मनुष्यांना तर आवडतेच शिवाय कुत्र्यामांजरांसारख्या समंजस प्राण्यांना व राघूमोरांसारख्या पक्ष्यांनाहि आवडते.

स्तुति आवडण्यांत गैर कांहीं नाहीं. तिच्या ऐकण्यानें मन प्रसन्न होतें, उत्साह वाढतो आणि परस्पर एकोपा वाढतो. घोडा कितीहि दमलेला असो, मालकानें त्यास चुचकारून शाबासकी दिल्यास पुनः नव्या दमानें तो चालूं लागतो. लहान मुलावरहि हा प्रयोग केल्यास पुष्कळदां यश येतें. ऐन युद्धांत संकटप्रसंगीं उत्साहाच्या एक दोन शब्दांनीं हतधैर्य झालेल्या फौजेनें जय मिळविल्याचे दाखले इतिहास सांगतोच आहे ! तात्पर्य, मनुष्याच्या जीवनांत स्तुतीचें महत्त्व मोठें आहे यांत शंका नाहीं.

योग्य वेळीं व स्थानीं स्तुतीमुळें कोणताहि कार्यभाग जसा चटकन् उरकतो तसा इतर कोणत्याहि गोष्टीनें होत नाहीं. जेथें स्तुति नाहीं, प्रशंसेचे चार शब्द नाहींत तेथें निरुत्साह, आळस, कामचुकारपणा

निर्लज्जवृत्ति, बेफिकीरी, बुद्धिहीनत्व, उर्मटपणा, अविश्वास इत्यादि दुर्गुणांचा सुळसुळाट झालेला दिसतो. नोकरानें आपल्या शक्तीबुद्धीप्रमाणें काम केलें पण तें मालकाच्या ध्यानांत आलें नाहीं; पत्नीनें सुंदर स्वयंपाक केला परंतु पतीनें त्याची कदर केली नाहीं; शिष्यानें अभ्यासांत हुशारी दाखविली परंतु गुरूनें तिकडे लक्ष दिलें नाहीं, तर त्याचा परिणाम त्या त्या व्यक्तींचें बाबतींत सुखासमाधानाचा होणें शक्य आहे काय?

मनुष्याची योग्यता असो अगर नसो, त्यास स्वस्तुति हवी आहे. आपण लोकप्रिय असावें; सर्वांनीं आपली वाहवा करावी; जिकडे तिकडे आपली प्रशंसा होत असावी, असें प्रत्येक मनुष्यास अंतःकरणापासून वाटत असतें. स्तुतीकरितां तो हपापलेला आहे. तो हव्यास त्यांच्या रोमरोमांत भिनलेला असतो.

मनुष्यानें स्वस्तुतीविषयीं इतकें आतुर असण्याचें कारणही तसेंच प्रबल आहे. प्रत्येकजण स्वतःवर जितकें प्रेम करितो, तितकें दुसऱ्या कोणावरहि करीत नाहीं. हें आत्मप्रेमच त्यास स्तुतिलुब्ध होण्यास भाग पाडतें.

समाजास आपण प्रिय असलों, लोकांना आपण स्तुत्य असलों म्हणजे आपल्या सौख्यास, संरक्षणास व हितास फारसा बाध येणार नाहीं, अशी खात्री वाटत असते; म्हणून आपण समाजाच्या स्तुतीस पात्र होण्यास झटत असतों. त्याचे मनाचा आपणास सारखा बाऊ वाटतो.

आपली ही कल्पना खोटी नाहीं. समाजामध्यें आपण परस्परांस मानतों, एकमेकांस सहाय्य करितों आणि एकमेकांच्या मतांबद्दल आदर बाळगतों म्हणूनच एकापासून दुसऱ्यास सौख्यप्राप्ति होत असते व संरक्षणाविषयीं सहाय्य मिळतें. सारांश, आपलें अस्तित्व सुखमय व्हावें म्हणून मनुष्यास स्तुति हवी; कारण पहिलें कायम टिकण्यास दुसरें एक उत्कृष्ट साधन आहे. असो.

स्तुति करण्याचीं अगर दर्शविण्याचीं अनेक साधनें मनुष्यानें निर्माण केलीं असून तीं कोणत्याहि समाजांत पाहाण्यास सांपडतात.

जगभर पसरलेल्या मनुष्यजातींपैकीं कोणताहि समाज घ्या. तो युरोपांत सुधारलेला असो अगर आफ्रिकेंतील जंगली असो; त्यामध्यें स्तुतिनिदर्शक अशा चालीरीती, पदव्या, मान-सन्मान, पारितोषिकें इत्यादि प्रकार जारी आहेतच. इंग्लंडांत व्हिक्टोरिया क्रॉस असेल, आफ्रिकेंत एखादा शिरला असेल, पण दोन्ही प्रकारांचा हेतु कोणातरी शूराचा सन्मान करण्याचाच असतो, हें निःसंशय होय.

त्याचप्रमाणें राजपद, सम्राट्पद, सरदाऱ्या, धर्मगुरुत्व, वर्णश्रेष्ठत्व इत्यादि प्रकारहि स्तुतिनिदर्शक असून ते निरनिराळ्या फरकानें सर्व समाजांत रूढ आहेत. अमेरिकेंत, फ्रान्समध्यें लोकसत्ताक राज्य आहे म्हणतात; खरें आहे, पण प्रेसिडेंटला त्यांना राजाइतका मान देणें भागच पडतें. त्याचप्रमाणें वर्णश्रेष्ठत्व व कुलश्रेष्ठत्व फक्त हिंदुस्थानांतच आहे असें नाहीं. निरनिराळ्या रूपानें हें सर्वत्र आहे. समान धर्मानें वागणाऱ्या अमेरिकेंतसुद्धां आहे.

मनुष्यानें समानबंधुत्वाच्या कितीहि बाता मारल्या व तें अमलांत आणण्याची कितीहि खटपट केली तरी स्वतःला श्रेष्ठ समजून दुसऱ्याला कनिष्ठ समजण्याचा मनुष्याचा जो एक उपजत गुण, तो असेपर्यंत हे प्रकार चालावयाचेच आणि हा चांगला किंवा वाईट उपजत गुण मनुष्यजात अस्तित्वांत असेपर्यंत नष्ट होणें शक्य नाहीं.

स्तुतिप्रियतेमुळें मनुष्यास सन्मान मिळविण्याची जशी आतुरता आहे, तशीच तो प्रसंगीं दुसऱ्यास देण्यासहि आहे. कारण स्तुतीचें देवाण केल्याखेरीज घेवाण मिळत नाहीं, हें तो पूर्ण जाणून असतो.

भिंत बांधण्यांस ज्याप्रमाणें दगडाबरोबर चुन्याचीहि गरज आहे, त्याप्रमाणें मनुष्यमात्राचा व्यवहार सुसंघटित चालण्यास आणि अनेक व्यक्ति

एके ठिकाणीं जुळण्यास स्तुति हें एक चांगलें साधन आहे. वाण्याचे दुकानीं गिऱ्हाईक जातांच त्यानें हास्यवदनानें त्याचें स्वागत करून स्तुतिपर शब्दांनीं गिऱ्हाइकाच्या गरजेची विचारपूस केल्यास सौदा किती झटपट पटतो याचा अनुभव प्रत्येकास कोठेंहि पाहाण्यास मिळेल.

मनुष्याच्या कोणत्याहि परस्परव्यवहारांत स्तुतिनिदर्शक अशा गोष्टी कळत न कळत सारख्या घडत असतात; नित्याच्या संवयीमुळें आपणास त्याचें महत्व वाटत नाहीं, एवढेंच. समाजांत खालपासून वरपर्यंत पाहिल्यास, जे कांहीं व्यवहार घडत आहेत, त्यांचा एकसंधीपणा स्तुतीनेंच जुळून आल्याचें आपणांस आढळून येईल.

राजानें प्रजेच्या हिताला जपणें व उलटपक्षीं प्रजेनें राजाला मानणें, सज्जनांनीं एकमेकांचा सत्कार करणें, सभेनें विद्वानांची वाहवा करणें, राजसभेंत वीरांचा सन्मान होणें, पतीनें प्रेमानें पत्नीची आर्जवें करणें, मित्रामित्रांनीं गोड बोलणें, ओळखीचें मनुष्य भेटल्यास चेहऱ्यावर हास्य दिसणें, चांगल्या कामाबद्दल कर्त्याला बक्षीस मिळणें इत्यादि ज्या गोष्टी घडतात, त्या सर्वांचे खालीं सूक्ष्म किंवा स्थूल प्रमाणांत स्तुति भरलेली असते. वेदांताच्या दृष्टीनें या प्रकारांत खरें सुख नसेल कदाचित्, परंतु तसे प्रकार घडावेत म्हणून मनुष्यमात्र सारखें धडपडत आहे. यांत शंका नाहीं.

स्तुतीचें आमिष फार दांडगें आहे. तिच्याकरितां मनुष्यास श्रीमान्, धनवान् किंवा बलवान् व्हावेसें वाटतें. शूरांचे पराक्रम व धाडसाचीं कृत्यें त्याचमुळें घडतात आणि मनुष्य स्वार्थत्याग करण्यास किंवा अत्यंत स्वार्थी होण्यास हिच्यामुळेंच शिकतो.

मनुष्य कांहीं स्वभावतः उद्योगप्रिय नव्हे. त्याच्या मनांत असलेली स्वस्तुतिप्रियताच त्यास चळवळ करण्यास भाग पाडते. निर्वाहापुरतें अन्न-आच्छादन मिळाल्यानंतरहि मनुष्य श्रीमान् होण्याची हाव कां बाळगतो ?

स्तुतीचा, सन्मानाचा लाभ व्हावा म्हणून ! गरीबाला कधीं कोणीं विचारलें आहे ? दुर्बलाला कधीं कोणीं मानलें आहे ? मूर्खाला कधीं कोणीं जवळ केलें आहे ? याचकरितां स्तुत्य असें कांहीं तरी मनुष्याजवळ पाहिजे, आणि तें हस्तगत होण्याकरितां व्यक्तिमात्र आपआपल्या शक्तीबुद्धीप्रमाणें प्रयत्नहि करतो.

मनुष्य स्तुतिप्रिय असला तरी त्यास ती कोणत्या स्वरूपांत आवडेल, याचा कांहीं नेम नाहीं. या बाबतींत रुचिभिन्नत्व दांडगें आहे. कोणाकोणाला तर निंदेच्या रूपाची स्तुति आवडते. 'तुम्ही कसले बदमाष ! त्याला दाद देतां होय !' अशा धर्तीची स्वतःविषयींची टीका ऐकूनही या अशा महाभागांना अत्यानंद होत असतो ! कित्येकांना आपल्या व्यसनांची स्तुति आवडते ! कित्येक आपल्या दुर्गुणांचें स्तोम माजवून घेतात आणि कित्येक स्वतःच्या उघड निर्भर्त्सनेचाच आनंद मानतात. अर्थात्, मनुष्यस्वभावाचे हे मासले खालच्या दर्जाच्या माणसात आढळतात. पण ते आढळतात हें खास. त्यांचें अस्तित्व आपणांस नाकारतां येणार नाहीं. जगरहाटीमध्यें त्यांचाहि काहीं उपयोग आहेच. पण त्याचा विचार येथें कर्तव्य नाहीं. असो.

स्तुतिविषयीं हा सामान्य विचार झाला. आतां तिच्या चांगल्या-वाईट रूपाविषयीं विचार करूं. कारण ती उभयविध आहे. त्यावरून तिचा सदुपयोग दुरुपयोग कळून येईल.

खऱ्या गुणाची चाह करणें, सद्‌गुणांस मानणें, थोर वृत्तींना सन्मान देणें, लोकोपकारक गोष्टींची वाहवा करणें इत्यादि बाबी चांगल्या व सत्य-स्वरूपाच्या स्तुतींत जमा होण्यास हरकत नाहीं, आणि अशी स्तुति व्यक्तीला किंवा समाजाला हितकरही होते.

गुणी मनुष्याच्या गुणाची जर चाह झाली नाहीं, तर त्यांची प्रगति कशी होईल ? वीरांच्या विजयाची वाहवा केली नाहीं तर त्यांना आनंद

पराक्रम करण्यास कसा हुरूप येईल? विद्वत्तेला जर मान न मिळेल तर ज्ञान मिळविण्याचे श्रम कोण घेईल? तात्पर्य, योग्य काळीं, योग्य स्थानीं व योग्य व्यक्तीचे ठायीं स्तुति केलीच पाहिजे. तिची तशी आवश्यकताच आहे. परंतु तिला जी एक सीमा आहे, ती तिनें केव्हांहि ओलांडतां कामा नये. तरच ती सदुपयोगी होते.

स्तुतीनें आपलें पाऊल मर्यादेबाहेर टाकलें कीं, तिचें रूप पतिव्रतेनें कुलटेचा धर्म पत्करण्याइतकें विकृत व त्याज्य होतें. या तिच्या रूपाला खुशामत असें म्हणतात.

खुशामत व हांजी हांजी हीं स्तुतीचीं अत्यंत हिडीस रूपें आहेत; परंतु असें असूनहि पुष्कळ मनुष्यांना त्यांची भुरळ पडते आणि या भुरळीनें मग मनुष्य जास्त नादान बनत जातो. शहाण्या मनुष्यानें या अधःपातास फारच जपलें पाहिजे. वास्तविक प्रशंसा व खोटी खुशामत यांमधील भेद ओळखण्याचा मनुष्यानें अभ्यास केला पाहिजे. खऱ्या स्तुतिपर शब्दांनीं जसा प्रगतीला वेग मिळतो, तसाच खोट्या स्तुतीनें तिला खड पडतो!

सज्जन लोक, खऱ्या थोर अंतःकरणाचीं माणसें, खुशामत करणें व करून घेणें अगदीं नापसंत समजतात. ते स्वतः हें पाप कधींहि आचरीत नाहींत. विजयोन्मुख तरुणांनीं ही गोष्ट लक्षांत ठेऊन तसें वागण्यास शिकलें पाहिजे.

मूर्खाला खुशामत आवडते आणि हीन मनाचीं माणसेंच बेमालूम खुशामत करण्यांत पटाईत असतात. या दोघांच्या संबंधांत दोघेहि पापी असतात व दोघेहि अधोगतीला जातात. कारण खुशामतींत असत्याचाच अवलंब करावा लागतो.

हीन मनुष्यानें केलेल्या खुशामतीपेक्षां सज्जनांनीं केलेल्या निंदेची योग्यता केव्हांहि जास्त आहे. कारण, पहिल्याचें अंतःकरण अशुद्ध व दुसऱ्याचें शुद्ध असतें.

खरी स्तुति अमृत आहे. खुशामत मद्य आहे. खरी निंदा औषध, आणि निर्भत्सना जलाल विष आहे! त्यांचा उपयोग करताना जपलें पाहिजे.

वरील विवेचनावरून स्तुतीचें महत्त्व वाचकांच्या लक्षांत येईलच. आतां मनुष्याच्या जीवनांत निंदेची आवश्यकता कशी आहे, याचा विचार करूं.

स्तुतीप्रमाणेंच निंदा दर्शविण्याचे प्रकार अनेक आहेत व ते सर्व राष्ट्रांत व सर्व समाजांत प्रचलित आहेत. या सर्व प्रकारापासून अलिप्त राहण्याची व्यक्तिमात्राची इच्छा असते, पण विशेषेंकरून व्यक्तिशः निंदेपेक्षां सामाजिक निंदेची भीति मनुष्यास जास्त वाटते.

व्यक्तिशः कोणी कोणाला चोर, ठक, दुष्ट, निर्दय म्हणून निंदा केली तर आपण फारसें मनावर घेत नाहीं; परंतु सर्व समाजाच्या दृष्टीनें तशी निंदा पत्करण्यास त्या मार्गातला मनुष्यहि कबूल होणार नाहीं. बरोबरच आहे, चोराठकांना तरी स्तुतीची आवड आहेच. शिवाय सार्वत्रिक निंदेंत आपल्या सुखाला, संरक्षणाला व हिताला धोका असतो.

निंदा ही वाईट आहे, ती कोणालाहि आवडत नाहीं म्हणून तिचा प्रयोग कोठेंच होऊं नये, असें मात्र म्हणतां येणार नाहीं. कारण, सारख्या स्तुतीनें जसें मनुष्य शेफारतें तसेंच सारख्या निंदेनेंहि तें निर्लज्ज व उर्मट बनतें.

निंदा हें कोयनेल खरें; पण तें तापकरी माणसाला व तेंहि योग्य प्रमाणांत पोंचेल तरच गुणकारी होतें, नाहीतर तें विषच आहे.

परंतु व्यवहारांत आम्हांपैकीं पुष्कळांना स्तुतीनिंदेचें महत्त्व बिलकूल कळत नाहीं. आणि त्याचमुळें त्यांचा कोठें व किती उपयोग करावयाचा याचें तारतम्य आम्हांस नाहीं.

आमच्या समाजांत ठिकठिकाणीं स्तुतिनिंदेचे दुरुपयोग होत असल्याचीं उदाहरणें आढळून येतात. त्यामुळेंच कीं काय कोण जाणे, आमच्या

देशांत चांगले नागरिक मोठ्या प्रमाणांत निर्माण होणें अशक्य होऊन बसलें आहे.

एकीकडे पाहावें तों कांहीं आईबाप आपल्या मुलांची इतकी हेटाळणी करीत आहेत कीं त्या बापड्यांचीं कोवळीं मनें त्या माऱ्याखालीं अगदीं करपून जात आहेत.

दुसरीकडे पहावें तों कांहीं लोक आपल्या पोरांची इतकी स्तुति करीत आहेत कीं त्या जड खुराकानें त्यांची प्रकृति बिघडून तीं बेताल होत आहेत.

हाच न्याय सर्व ठिकाणीं लागू आहे. कोठें बंधू चुकत आहेत, कोठें सासवा चुकत आहेत, कोठें मालक चुकत आहे आणि कोठें नोकर चुकत आहेत. कोठें स्तुतीचा मारा जास्त होतो तर कुठें निंदेचा होतो आहे. कोठें दोन्ही गोष्टी अनाठायीं होत आहेत.

ही स्थिति समाजहितदृष्ट्या बरोबर नाहीं. स्तुतीनें अगर निंदेनें जर गुणांची नासाडी होत असेल तर त्याचा योग्य वेळीं बंदोबस्त होणें अगदीं इष्ट आहे.

स्तुति-निंदेची बरोबर वांटणी होण्यास मनुष्यानें स्वतःची व दुसऱ्याची योग्यता अजमावण्यास शिकलें पाहिजे. पहिली गोष्ट प्रत्येकानें ही ध्यानांत ठेविली पाहिजे कीं, सदासर्वदा निंदा करण्याइतकें वाईट मनुष्य या जगांत एकहि नाहीं. त्याचप्रमाणें ज्याची सर्वतोपरी स्तुति करतां येईल इतका सर्वांगपूर्ण गुणी मनुष्यहि कोठें नाहीं.

गुणदोषांची सरमिसळ सगळीकडे आहे. तेव्हां फार मोठे गुण असून किरकोळ दोष असतील तर ते विशेष लक्षांत न घेतां गुणांचा उत्कर्ष होईल असा त्यांचा परामर्ष घ्यावा.

त्याचप्रमाणें दोष. फार मोठे दोष असले तर केवळ भिडेनें किंवा प्रेमानें त्यांचेकडे कानाडोळा करणें बरें नाहीं. त्यांची योग्य संभावना झालीच पाहिजे.

पण एक गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे; कटु निंदेपेक्षां प्रेमाच्या शब्दांनीं कार्यभाग होण्यासारखा असेल तर त्याचाच प्रयोग करावा हें बरें. निर्भर्त्सनेपेक्षां शाबासकीनें मनुष्य जास्त लौकर वश होतो, ही गोष्ट विसरून चालणार नाहीं.

फार गोड खाणें वाईट. फार तिखट खाणेंहि वाईटच. त्याचप्रमाणें सदा स्तुति करणें अगर निंदा करणें वाईटच आहे. " अति सर्वत्र वर्जयेत् ! "

आत्मस्तुती करण्याची ज्याला खोड लागली आहे, तो खुशामतीच्या जाळयांत अचूक सांपडतो आणि तोच जबरा परनिंदक असतो. या दुर्गुणांपासून आपलें रक्षण आपणच केलें पाहिजे. आपल्या तोंडावर आपली स्तुति व्हायला लागली म्हणजे आपल्या पश्चात् आपली निंदा होत असली पाहिजे, असें अनुमान खुशाल करावें. कारण मनुष्याचे मनांतील आदरभाव हा फारसा बोलका नाहीं. तो कृतीनें दिसतो.

कृतज्ञता ही जशी मुकी आहे, तसाच आदरभावही मुकाच आहे.

तुम्हांला एखाद्या व्यक्तिविषयीं खरोखरीच अभिमान वाटत असेल, त्याला खरोखरी मान देण्याची तुमची इच्छा असेल तर तो कृतीनें दर्शवा. थोर लोकांना तोंडावर केलेली स्तुति अगदीं खपत नाहीं. तोंडपुजेपणाचा त्यांना तिटकारा वाटतो.

खुशामतीचा तिटकारा ज्याला येत नाहीं, जो त्या भुरळीमध्यें फसतो, त्याला कोणता धूर्त मनुष्य कोणत्या वेळीं धोका देईल याचा नेम नाहीं. खुशामत हा एक प्रकारचा सुवासिक परंतु विषारी वायु ( Gas ) आहे. त्याच्या दर्पानें झिंगल्यास शत्रुमित्रत्वाचा खरा बोध होत नाहीं, गुणावगुणांची खरी परीक्षा होत नाहीं. आणि त्याचमुळें मग स्वतःची सुधारणा होण्यास अडचण पडते.

कोणाचीहि खोटी निंदा अगर स्तुति करूं नका. स्वतःची सुद्धां करूं नका. आत्मस्तुति जशी गैर तशीच आत्मनिंदाहि गैरच आहे. कित्येकांना आत्मनिंदा करणें हें विनयाचें लक्षण वाटतें; पण तसें तें नाहीं.

नेहमीं तुम्ही स्वतःची किंमत कमी करून बोलूं लागलांत तर सामान्य जनता तुम्हांला कमी प्रतीचे समजेल. कांहीं लोक तुम्हांस ढोंगी म्हणतील आणि शहाणे लोक मूर्ख म्हणतील.

कोणत्याहि गुणांची चाह करितांना ती योग्य प्रमाणांत ठेवा. कमी प्रमाणांत कराल तरी चुकेल आणि जास्त प्रमाणांत कराल तरी चुकेल. त्याचप्रमाणें दोषांची निर्भर्त्सना करितांना.

तुमची निर्भर्त्सना ऐकून दोषी मनुष्यास 'खरेंच आपली चूक झाली बरें का!' असें मनापासून वाटलें पाहिजे. दुसऱ्याचे दोष सुधारण्याचे हेतूनें जी निंदा करावयाची ती होतां होईतों सार्वजनिक नसावी. त्याची त्यालाच फक्त ऐकवावी. उघड सर्वांसमोर झालेल्या अपमानाचें मनुष्यास फार वाईट वाटतें. त्याची त्याला चीड येते आणि तो ज्यानें केला असेल त्याचेविषयीं त्याचे मनांत प्रेम राहात नाहीं.

पुष्कळ माणसें अशीं आहेत कीं, आपल्याच निकटच्या माणसांची निर्भर्त्सना सर्वांसमोर करीत सुटावयाचें त्यांना वेडच असतें. पतीनें आपल्या पत्नीची निंदा स्वतःच्या मुलांसमोर किंवा शेजाऱ्यापाजाऱ्यांसमोर करणें अगदीं अप्रशस्त होय. आपल्या पत्नीचा योग्य मान आपणच ठेवला नाहीं तर दुसरा कोण ठेवील?

दहा जणांच्या कुटुंबांत एखाद्या सासुरवासणीस सर्वच माणसें धुतकारतात. मुलेंबाळें सुद्धां तिचा मान ठेवीनातशीं होतात, अशा स्थितींत तिला कोणाविषयीं आसपणा वाटेल?

कुटुंबांत शांतिसमाधान व परस्परप्रेम राहावें, अशी इच्छा असणाऱ्यांनीं, समाजाला बळकटी असली पाहिजे असें मानणाऱ्या विचारवन्तांनीं

आणि राष्ट्रोद्धारार्थ झटणाऱ्या पुढाऱ्यांनीं व्यक्तिमात्रांत आढळून येणाऱ्या या स्वभावविशेषांकडे नीट लक्ष दिलें पाहिजे. इतर अनेक उपायांप्रमाणें योग्य वेळीं स्तुति व योग्य वेळीं निंदा असें वाटप योग्य प्रमाणांत होईल अशी दक्षता घेतल्यास त्याचा सुपरिणाम दिसल्यावांचून राहणार नाहीं.

---

## प्रकरण बारावें

### १

**प्रत्येकास पुढारी हवा.**

या लेखाङ्काचा खरा अर्थ आहे—प्रत्येक माणसाला जीवन आक्रमण्यास कांहींना कांहीं आधार हवा असतो. निराधारपणानें आयुष्य कंठणें कोणालाहि शक्य नाहीं. रानावनांत राहणारा योगीसुद्धां परमेश्वर चिंतनाच्या आधारानें असतो आणि समाजांत एकाकी वाटणारीं माणसेंहि कुत्रीं, मांजरें किंवा पोपट पाळून आपला आधार निर्माण करितात. ही गोष्ट ध्यानीं घेऊन पुढारी हवा म्हणजे काय हें ओळखावें.

सकृद्दर्शनीं जगाची एकंदर घडामोड मोठी घोटाळ्याची, गबाळी व कशीतरी चालल्याचें दिसतें. त्यांत कांहीं सूत्रबद्धता असेल असें वाटतच नाहीं. पण थोडा विचार करूं लागलें कीं, साऱ्या गोष्टी सापेक्ष असून, कांहीं विशेष नियमानें चाललेल्या आहेत. ज्वालामुखीचे पेट, भूकंपाचे धक्के, तारांचे उल्कापात, धूमकेतूंचे उदय, प्रलय करणारीं वादळें इत्यादि भयंकर गोष्टींनाहि कांहीं नियम आहेत व कार्यकारणभाव आहे असें शास्त्रज्ञ सांगतात. अर्थात् जेथें नियमबद्धता आहे तेथें कांहींतरी प्रमुखता, व त्या प्रमुखतेच्या आधारें चाललेली घडामोड असा प्रकार असतो. आकाशांत तळपणारा सूर्य घ्या. हा आपल्या ग्रहादिकांचा प्रमुख आहे. पृथ्वीहि

त्याच्या आधारानें फिरतें. म्हणजे सूर्य नायक आणि त्याच्याभोंवतीं फिरणारे त्याचे ग्रह त्याचे अनुयायी. सूर्यसुद्धां आपल्या ग्रहमालेसह दुसऱ्या कोणत्या तरी केंद्राभोंवतीं गिरक्या घेतो आहेच.

कोणीतरी प्रमुख व कोणीतरी अनुयायी. साऱ्या वस्तूंत, साऱ्या कोटींत हा नियम चालू आहे आणि तोच मनुष्यमात्रांत उतरला आहे. मुंग्या, माश्या—मधमाश्या—केवळ्या मोठ्या समूहानें राहातात, पण त्यांच्यांत एक राणी असते. ती सर्वांची स्वामिनी व बाकी सर्व अनुयायी. हत्तीच्या कळपांत तेंच असतें. कोणीतरी म्होरक्या व बाकीचे पाठीमागून जाणारे. पक्ष्यांच्या थव्यात हाच प्रकार. तात्पर्य, निर्नायक असें कोणी नाहींच. मनुष्यमात्रांतहि तशीच व्यवस्था आहे. मी कोणाचा तरी अनुयायी असतों व मला कोणीतरी नायक मानतात; आणि माझा नायकहि कोणाचा तरी अनुयायी असतो. पृथ्वीवरील कोणताहि समाज घ्या, तो सुधारलेला असो किंवा मागासलेला असो, नायक व अनुयायी असा प्रकार आहेच आहे.

कोणाच्या तरी पाठीमागून चालणें व कोणाला तरी मागून चालवीत सांभाळून नेणें हा मनुष्यस्वभावच होय. दोन माणसें एखादें काम करीत असोत. त्यात एक पुढारी व दुसरा अनुयायी असतोच. मुलांच्या खेळांत तेंच दिसतें व चोरांच्या टोळींतहि तेंच आढळतें. मनुष्य एकट्यानें कांहीं करूं लागला तरी त्याला त्या बाबतींत दुसऱ्याच्या विचारें चालणें इष्ट वाटतें. मोठ्या समुदायांत एखादा प्रसंग घडत असतो. अनेकांच्या अनेक बुद्धया व कल्पना चालत असतात. प्रत्येकास नायक होण्याची अनावर हौस असते. परंतु कार्य उरकायचें म्हटल्यानंतर त्यांत कोणीतरी एक नायक ठरविला जातो व बाकीचे लोक, कुरकुरत का होईना, त्याचे अनुयायी होतात. अर्थात् नायकत्व सवंग नसतेंच. जो विशेष बुद्धिमान, धडाडीचा, धाडसी, विचारी असेल, तोच त्या स्थळीं आपसुख येतो. कुटुंबाची

व्यवस्था, समाजाची व्यवस्था, धर्मव्यवस्था आणि राज्यव्यवस्था यांची स्थापना या पद्धतीनें होत गेली. प्रथम कोणी तरी शास्ता व नियंता. मग कार्याची अंमलबजावणी.

मानवेतर प्राण्यांत नायक–अनुयायी यांचे संबंध आणि संघाची एकंदर व्यवस्था अत्यंत नमुनेदार असेल तर ती मुंग्या व मधमाश्या यांच्या राज्यांतील होय. एका एका वारुळांत लक्षावधि मुंग्या असतात. पण त्या साऱ्या मुंगी–राणीच्या आज्ञेंत. मधमाश्यांची गोष्ट तशीच. पोळ्यांत हजारों मधमाश्या पण त्यांच्यावर हुकमत एका राणी–माशीची. त्यांचा हा गुण माणसानें खरोखर लक्षांत घेण्यासारखा आहे. नायक–अनुयायी यांच्या संबंधींचें या चिमुकल्या प्राण्यांचें ज्ञान उपजत आहे. तर माणसानें अनुभवानें शहाणे होत व सुखसोयी पाहात तें पत्करलें आहे. यामुळें या बाबतींत माणूस अद्यापि कच्चाच आहे असें म्हणावें लागतें.

कांहीं असो. नायक–अनुयायी हें नातें मानव स्वभावांत उपजत असण्याइतकें प्राचीन असून त्याचें प्रतीक राजा–प्रजा नात्यानें आजहि आपल्यास पाहण्यास सांपडतें. हिंदुस्थानांत तें सर्वत्र चालू असून हिंदी प्रजेला तर अद्यापि एका बलाढ्य साम्राज्यशाहींत नांदावें लागत आहे. ही स्थिति चांगली कीं गर्हणीय ही गोष्ट अलाहिदा.

मानव समाजाची जसजशी सुधारणा होत चालली तशी त्याच्या मूळ रानटी स्वभावाचीहि झाली. यामुळें राजा–प्रजा नात्यांतहि पालट पडत चालला, राजसत्ता जुलमी असूं शकते असें अनुभवास येतांच लोकशाहीचा उदय झाला. या नव्या प्रकारानें राजे–महाराजांचें महत्त्व झपाट्यानें कमी होत चाललें. राजकुलेंहि मागें पडत चाललीं. इंग्लंड–जपानादि देशांत राजसत्ता असतांहि ती इतकी मर्यादित आहे कीं सर्वत्र लोकशाहीचा उदय गाजतो आहे. पण यांतहि नायक–अनुयायी हें नातें आहेच. लोकांना आपला नायक निवडण्याचा अधिकार प्राप्त झाला आहे इतकेंच निर्नायक

अशी राजसत्ता आज तरी अस्तित्वांत नाहीं. उलट, राजालाहि लाजविणारे हुकूमशहा निर्माण झालेले दिसतात.

मुंग्या मधमाश्यांच्या राज्यांत राणी नाहींशीं झालीं कीं, मोठा घोंटाळा माजतो म्हणतात. मानव समाजांतहि तसेंच होतें. लोकशाहीच्या अध्यक्षांच्या निवडणुकी हेंच दर्शवीत नाहींत काय ? राजसिंहासन मोकळें राहतां कामा नये हा पूर्वींचा दंडक आजहि निराळया रूपानें अस्तित्वांत आहे, असेंच म्हणावें लागतें. शीखधर्मानें राजाला उडवलें पण धर्मगुरूलाच राजाचे अधिकार प्राप्त झाले. त्यांतहि गुरूवांचून गादी कित्येक काळपर्यंत चालली नाहीं. आज तो पंथ आपल्या ग्रंथ साहेबाला राजा मानतो. या शिवाय नायक–अनुयायांचें नातें आहेच.

पूर्वींच्या काळीं वंशपरंपरेनें चालत आलेली राजकुलें होतींच. शिवाय एखादा बलाढ्य व पराक्रमी पुरुष दंडुक्याच्या जोरावर राजा उर्फ नायक बनत होता; मग त्याची सत्ता, मनांत असो वा नसो, मानावी लागे. आतां लोकशाहीचा काळ आला असून व्यक्तिस्वातंत्र्य व मतस्वातंत्र्य यांना भरपूर वाव मिळालेला आहे. यामुळें अमक्याचें अनुयायित्व स्वीकारलेंच पाहिजे असा जुलूम नाहीं. हा चालू काळांत मोठा फायदा आहे; पण त्यांत एक मोठा दोष आहे. अध्यक्षपदाला योग्य पुरुष निवडावयाचा कसा ही मोठीच पंचाईत पडते. वर्तमानपत्रांमुळें प्रचारतंत्र कमालीचें वाढलें आहे. ज्याचा आवाज मोठा तो शहाणा असली भानगड निर्माण झाली असून लोकशाही धोक्यांत आहे. याचा अर्थ नायक–अनुयायी या नात्यास मनुष्य कंटाळला आहे असा मात्र नाहीं. हें नातें सतत चालू राहाणार. सर्वसामान्य जनतेनें सावध राहून नायक निवडण्याच्या बाबतींत विशेष दक्षता घेतली तर लोकसत्ता यशस्वी होईल. उंदरांनीं राजा निवडतांना तो मांजर नसेल अशी काळजी घेतली पाहिजे आणि बेडकांनीं राजा शोधतांना लाकडाच्या ओंडक्याला भुलतां उपयोगी नाहीं.

माणूस मानतो तितकें नायकत्व सोपें नाहीं, ही गोष्ट नायक म्हणून पुढें घुसणाऱ्या माणसानें ध्यानांत ठेवण्यास हवी. त्याचप्रमाणें अनुयायित्व, दोघांचीं कांहीं विशिष्ट कर्तव्यें आहेत, कांहीं उत्तरदायित्व आहे. उभयपक्षीं त्यांचें परिपालन झालें पाहिजे.

नायक हा सर्वांचा म्होरक्या, सर्वांवर हुकमत चालविणारा; पण आपल्यामागून येणाऱ्या समाजाची त्यानें सर्वतोपरी काळजी वाहिली पाहिजे. इतकी कीं, त्यांत त्याचें सौख्य जाईलच; पण प्राण खर्चीं पडले तरी त्यानें माघार घेतां कामा नये. नायक नेहमींच धीरगंभीर विचारी, प्रसंगावधानी दूर दृष्टीचा असा असावा. त्याचप्रमाणें अनुयायी. नायकाच्या पावलावर पाऊल टाकणारा, विश्वासू, कार्योत्सुक व एकनिष्ठ पाहिजे.

कुटुंब, शाळा, कारखाना, दुकान, व्यापारव्यवहार या सर्व स्थानीं नायक–अनुयायी नातें या ना त्या रूपांत वावरत असतें; पण तें शुद्ध स्वरूपांत पाहिजे. नायक–अनुयायी परस्पर तुल्यबळ, परस्परांस अनुरूप हवेत. गीतेचा शेवटचा श्लोक यादृष्टीनें लक्षांत ठेवण्यासारखा आहे. योगेश्वर कृष्णाच्या मागें धनुर्धरपार्थ असला कीं वैभवाला व विजयाला तोटा नाहीं. यश निश्चित असावयाचेंच.

## २

### मनुष्यस्वभावांत लिंगभेदाचें स्थान.

माणसाचे मुख्य घटक केवळ दोनच. स्त्री आणि पुरुष या दोन्ही पक्षांत न बसणारा तृतीयपंथ आहे. आणि त्याचाहि विचार मानव–स्वभाव–दर्शनांत कोठें तरी थोडा फार झाला पाहिजेच. पण त्या संबंधीं पुढें पाहूं. सध्यां आपण विचार करूं मूळ घटकांचा. शारीरशास्त्रदृष्ट्या स्त्रीपुरुषांच्या देहरचनेंत साम्य पुष्कळ, विरोध थोडासा. पण लिंगभेद अगदीं स्पष्ट. आणि त्याला धरून देहांतील फरक. या साम्य–विरोधामुळें

या दोन्ही घटकांचे परस्पर संबंध कसे आहेत, याचा पुसटता विचार मागे एक दोन स्थानीं केलेला आहेच.

आतांपर्यंत मानवस्वभावाची पाहाणी मनुष्य हा एकला एक प्राणी मानून व उभय घटक अभेद्य मानून केली. या लेखांत त्या दोघांतील लिंगभेद प्रामुख्यानें विचारांत घ्यावयाचे आहेत, आणि त्याला अनुसरून मानवी स्वभाव व जीवन कसकसें परिणत झालें आहे, हें पाहावयाचें आहे.

कामपुरुषार्थ हा या दोन्ही घटकांचा मुख्य आधार. दोघांच्या, किंबहुना मनुष्यमात्राच्या, जीवनाचा पाया पण आपल्यास जें समालोचन करावयाचें आहे तें या संबंधाला गौण मानून निराळ्या दृष्टीनें करावयाचें आहे. म्हणजे एतद्विषयक विकार लक्षांत न धरतां विचार करावयाचा. अवघड आहे हें. कारण, यावर निश्चित विचार अद्यापि झालेले नाहींत. स्त्रीपुरुष–संबंधाचीं अनेक रहस्यें शास्त्राला व शास्त्रज्ञांना उपलब्ध व्हावयाचीं आहेत. यामुळें सध्याचा सारा विचार केवळ कामशास्त्रापुरताच झाला आहे. याच्या पलीकडे जाऊन मानव स्वभावांत लिंगभेदाला काय महत्त्व आहे, याची चर्चा झाली पाहिजे. हा लेखाङ्क त्या धर्तीवर आहे.

स्त्री आणि पुरुष यांची लिंगभेदविषयक भिन्नता दृष्टीपुढें ठेवून विचार करूं लागतांच एक गमतीची वा नवलाची गोष्ट ध्यानीं येते. ती या दोघांची परस्परांविषयींची मतप्रणाली होय. मोठी विचित्र व परस्पर विरोधी अशी ती दिसते, भासते. तसें पाहिलें तर दोघांचें परस्परांविषयींचें आकर्षण पराकोटीचें; दोघांनाहि परस्परांच्या संगतीची इष्टता व आवश्यकता. पण असें असतां दोघांचीं दुसऱ्याबद्दलचीं मतें ऐकावीं, मनें शोधावीं. तीं असावीं तितकीं चांगलीं नाहींत, स्वच्छहि नाहींत, असा विचित्र देखावा. बरें, या देखाव्यावर विसंबून कांहीं अनुमान बांधावें तर?—लागलीच विरुद्ध टोकाचें दृश्य !

प्रणयाचा उन्माद अंगी संचारण्याचा अवकाश, तो तिला देवता समजतो. ती त्याला हृदयेश्वर समजते. दोघेंहि आपआपल्या पूजेंत—अर्चनेंत —अगदीं दंग. दोघांचें हृदय एक. आनंद एक. स्वर्गसौख्य एक! तीं प्रेमगीतें—तो शृंगार! ती धुंदी! ती परस्पर पूजा आणि तो गौरव! सारेंच अपूर्व : शीग ओसंडून चाललेलें!

पण हें औट घटकेचें राज्य संपतांच पाहावें, सारें चित्र पुसलेलें. रंग उडालेला, पूजा विसकटलेली, निराजन पालथें झालेलें, आणि उदबत्ती जळून गेलेली!—मागें राहिलेला असतो निर्माल्य तिच्या सुस्कारांचा आणि त्याच्या निराशेचा! अशा अवस्थेंत दोघांचा परस्परांविषयींचा अभिप्राय विचारला तर?

पुरुष—स्त्री! स्त्री!— काय विचारतोस अभिप्राय! साक्षात् विषाची पुतळी! अनृताची खाण! साहसाचें माहेरघर! कपटाची कोलीत!—

स्त्री—राक्षस! पुरुष म्हणजे शुद्ध राक्षस! दुष्ट! विश्वासघातकी! स्वार्थी!— लोचट! थापाड्या!—

या असल्या दुटप्पी वर्तनांत कोणाला दोष द्यायचा?

साधारणपणें समजूत अशी आहे कीं, आमच्या धर्मांत व कथापुराणांत स्त्रीनिंदा ओतप्रोत आहे व पाश्चिमात्त्यांचें स्त्रीदाक्षिण्य कित्याप्रमाणें आहे. त्यांत प्रामाणिकपणा आहे व हवें तें आहे!

या दोन्ही समजुती चुकीच्या आहेत. आमच्या इकडे नारीजातीचा यथोचित गौरव केलेला असून, तिची निंदा संन्यासाश्रमापुरती मर्यादित आहे. भार्या या नात्यानें आमच्याकडे स्त्रीला अगदीं बरोबरीचा मान असून गृहस्थाश्रमांत तिला गृहदेवता—राज्ञीच—मानली आहे. याच्या उलट, खिस्ती—महम्मदी धर्माच्या स्त्रीविषयक कल्पना पाहाव्या व निंदा ऐकावी! कमालीची आहे! अगदीं अर्वाचीन कालांतहि युरोप—अमेरिकेंत स्त्री

जातीला तुच्छ लेखून तिची कुचेष्टा करण्याचे प्रयत्न चालू असतात. अर्थात् स्त्रीवर्गाकडून तसाच उलट आहेर पुरुषांना सादर होतो.

सांगायचें तात्पर्य, स्त्रीपुरुष परस्परांविषयीं साफ दिलाचे नाहींत असें स्पष्ट दिसतें. प्रेम आणि विस्तुष्ट यांचें हें विलक्षण संमिश्रण आहे. एकच गोष्ट ठळक आहे कीं, पुरुषांची स्त्रीनिंदा ग्रंथलिखित आहे तशी स्त्रियांची पुरुषांविषयींची आढळत नाहीं.

संसार चाललेले आहेत. परिस्थितीला धरून समाज धारणाहि होत राहिली आहे आणि विवाहसंस्था वंशविस्ताराचें कार्य चालवीत आहे. पण ज्यांच्यामुळें हें सारें घडतें त्या स्त्रीपुरुषांचे परस्परसंबंध मात्र वर सांगितल्या धर्तीचे आहेत. अपवादाची गोष्ट वेगळी. नियम सर्वत्र आढळतो. या विलक्षण एकोप्याचें रहस्य स्त्रीपुरुषांच्या स्वभावरचनेंत असेल काय ?

कोणीं सांगावें ? पण जननशास्त्र सांगतें कीं जीवोत्पत्ति प्रथमतः एका चैतन्यमय अणूपासून झाली. या एका अणूचेच फुटून तुकडे झाले. यांपैकीं कांहीं तुकडे ( Cells ) आकारानें मोठे व काहीं लहान होते. छोटे अणू हे पुल्लिंग जीव आणि मोठे स्त्रीलिंग जीव. या दोन प्रकारांत मुळापासूनच लिंगभेदाखेरीज आणखी कांहीं विशेष आढळले.

पुरुष जीवाणु मुळापासूनच चळवळ्या, दंगेखोर, भटक्या स्वरूपाचा असतो तर स्त्री जीवाणु थंड, सोशीक आणि स्थायी स्वरूपाचा असतो. या मूळ स्वरूपाचा विचार केला म्हणजे पुरुष प्रकृति उत्साही, आतुर, उच्छृंखल, बहुरूपी, प्रागतिक व कल्पक कां आहे, आणि स्त्रीप्रकृति सहनशील, सनातनी, स्थिर, सहानुभूतिक, एकनिष्ठ व शांत कशी आहे, हें ध्यानांत येतें. जीवनधारणेंत पुरुष आपला जोम सारखा उपयोगांत आणीत असतो तर स्त्री वनस्पतीप्रमाणें तो सांठवून ठेवीत असते. पुरुषांचें लक्ष आत्मजोपासनेवर असतें तर स्त्रीचें वंश ( जाती ) जोपासनेवर असतें. गुन्हेगारी व उनाडकी या दोन्ही बाबींत पुरुष अगदींच बेलगामी आहे.

म्हणूनच पिता वाईट असला तरी चालतें; पण माता वाईट असून चालत नाहीं. वंश रक्षणाच्या दृष्टीनें हा फरक महत्त्वाचा आहे.

स्त्रीच्या बोलण्याचालण्याचा हावभावाचा व एकंदर वर्तनाचा पुरुषाच्या मनावर जसा चटकन् प्रभाव पडतो तसा पुरुषांच्या कोणत्याहि थाटामाटाचा स्त्रीवर तितका परिणाम होत नाहीं. ती त्या माकडचेष्टा समजते व म्हणूनच सावध असते. तरी पुरुष हिकमती व शिकारी आहे. स्त्री भोळी शिकार आहे याच्या उलट उदाहरण घडूं शकतें. पण तें अपवादात्मक.

पुरुष स्वार्थाकरितां अन्न मिळवितो; पण त्याच्याकरितां चूल मांडून संसार थाटणें स्त्रीलाच साधतें. मानवजातीची सुधारणा, संस्कृति निर्माण केली पुरुषानें; पण तिचें संगोपन झालें स्त्रीकडून. पुरुष केवळ संरक्षक तर स्त्री संरक्षक असून शिवाय संगोपक आहे.

असा विचार केला म्हणजे ध्यानांत येतें कीं, पुरुषप्रकृति ही विकर्षणाची ( बाहेर पसरणारी ) असून स्त्रीप्रकृति आकर्षणाची (केंद्रीभूत) आहे. पुरुष भटक्या व स्त्री घरेलू असण्याचें कारण हेंच होय. म्हणजे विश्वांत ज्या दोन गति चालू आहेत, त्यांचें हें चिमुकलें स्वरूप होय.



पुरुषप्रकृति



स्त्रीप्रकृति

पुरुष उनाड असल्यामुळें स्वभावतःच धाडसी, कल्पक पण निरुद्योगी आहे. स्त्री शांत, सहनशील व कनवाळू असल्यामुळें घरगुती कार्ये ती सारखीं करूं शकते. स्त्रीचें आकर्षण नसतें तर पुरुष संसारी झालाच नसता. पण स्त्रीनें त्याला डांबून धरलें आहे. मुलें अवतरल्यावर स्त्रीनें किनीतरी घरगुती कामें पुरुषावर टकलली. तेव्हां त्यानें तीं तीं कामें चटकन् उरकरण्याच्या युक्त्या योजून आपली सुटका करून घेतली. चाक हें पुरुषाच्या बुद्धिमत्तेचें पहिलें निशाण होय. यांतून यंत्रविद्या कळसाला पोंचली.

या दृष्टीनें राज्यस्थापना, कायदा, लढाई, सैन्य, मैदानी खेळ, देशविदेश हिंडणें, राजकारण, कारखाने, शास्त्रीयसंशोधन, तत्त्वज्ञान, प्रचारतंत्र आणि तोंडपाटीलकी हीं पुरुषी वळणाचीं कार्यें निर्माण झालीं. आणि अपत्यसंगोपन, गृहविज्ञान, पाकशास्त्र, वस्त्रप्रावरणें, अलंकार, दयाशीलता, दानधर्म, रुग्णशुश्रूषा इत्यादि कार्यें बायकांच्याकडून निघालीं.

पुरुषाला आपलें जीवन साहसी व खेळकर पद्धतीचें असावें असें वाटतें. कां ?—उनाडक्या करीत, साधतील तीं सुखें भोगण्यांत त्यास गमत वाटते म्हणून. स्त्रीला आपलें जीवन कर्तव्यमय वाटतें. कां ? तिच्या कष्टांतून त्याचा उद्भव असतो म्हणून !

तात्पर्य, पुरुष तो पुरुष आणि स्त्री ती स्त्री ? कोणीहि श्रेष्ठ नाहीं, कनिष्ठहि नाहीं. दोघांना लिंगभेद आहे आणि त्याला धरून त्यांचे स्वभाव आहेत !—आणि मानवजातीच्या अस्तित्वापर्यंत ते तसेच राहाणार.

आज काल स्त्रीचें कर्तृत्व घराबाहेर दिसूं लागलें आहे. पुरुषाच्या बरोबरीनें ( शारीरिक दौर्बल्य लक्षांत ठेवलेंच पाहिजे. ) ती सर्व कामें तितक्याच चांगलेंपणानें पार पाडूं लागली आहे; पण या तिच्या वाढत्या व्यापाचा फायदा तिला स्वतःला, पुरुषांना व समाजाला होईल का ?—पुरुषी कामें करूं लागल्यावर स्त्रीचें मार्दव कमी होऊन ती राठ दिसूं

लागते, तिच्यांत उनाडपणा शिरतो आणि तीहि साहसी बनूं पाहाते. हा फरक भावी काळात कोणता गोंधळ निर्माण करील, काय नेम सांगावा ?— सध्या जगात लोकशाहीच्या नांवावर केवढा मोठा नरमेध सुरू आहे. यांतून कोणते सामाजिक पेचप्रसंग निर्माण होतील—

पण तो आपला विचार नव्हे. मनुष्यस्वभावांतील लिंगभेदाचें महत्त्व आपणांस पाहावयाचें होतें. तें आपण पाहिलें. आपलें काम झालें.

---

## प्रकरण तेरावें

### १

#### मनुष्यमात्राचें मन दुहेरी आहे !

मनुष्यस्वभावासंबंधीं विचार करीत आपण अगदीं मुळाजवळ आलों. एकदर विवेचनाच्या दृष्टीनें हा लेखांक महत्त्वाचा. वर्तुळाच्या केंद्राप्रमाणें. पण तो समजून सांगण्यास मात्र तितका सोपा नाहीं. ज्ञात भाग थोडा व अज्ञात भाग फारच दांडगा ! एखादें गूढ रहस्यच. लेखकालाच त्याचा आटोप नीटसा झालेला नाहीं. तरीपण स्थूलरूपानें सांगता येईल तेवढें सांगतो, आणि सुलभता आणण्याचा प्रामाणिक प्रयत्न करितों.

मनुष्यमात्राचें मन दुहेरा आहे !— म्हणजे काय ? मुळात प्रकरणाचा मथळा आहे. Everybody is Conscious and Sub-conscious. याचा शब्दशः अर्थ—प्रत्येकजण जाणीव ठेवून व अर्धवट जाणीव ठेवून असतो ( वागतो. )— असा आहे. तो अगदींच चमत्कारिक— न समजण्या-सारखा आहे. म्हणून संबंध लेखाचा इत्यर्थ जाणून— व्यक्तिमात्राचें मन दुहेरी आहे— असा सोपा मथळा घेतला. संबंध लेख वाचल्यानंतर वाचकांना तो पटलेसें वाटेल.

आतां दुहेरी मन म्हणजे काय तें पाहूं.

माणसाकडे पाहातांच त्याला शरीर व मन अशीं दोन साधनें जीवन कंठण्याकरितां लाभलेलीं दिसतात. शरीर दृग्गोचर असून शास्त्रीय शोधांनीं तें आंतलेंहि स्पष्ट झालें आहे. सध्याचें वैद्यक व शरीर-शास्त्र देहाची अंतर्गत रचनाहि सुलभतेनें सांगूं शकतात. पण या देहाचा स्वामी जें मन तें पूर्ण अगोचर असून, त्याचें वास्तव्य शरीरांत कुठें आहे, याचाहि थांग नीटसा लागलेला नाहीं.

पण मनाचें अस्तित्व व सामर्थ्य जगन्मन्य आहे. मन ताळ्यावर असेल तरच ज्ञानेंद्रियें आपआपलीं कार्यें नीट करूं शकतात, नाहींतर नाहीं, हेंहि सर्वांना माहीत आहे. पण बाकी मनाचें एकंदर स्वरूप मोठें गूढ आहे. सध्या मानसशास्त्र पुष्कळ प्रगत झालें असून माणसाच्या मनासंबंधीं कांहीं शोध लागलेले आहेत.

मन हा इंद्रियांचा राजा असून त्याच्या इच्छेनें देहाचा व्यापार चालतो. हा राजा जेवढा बलवान् तेवढाच चंचल आहे. या सामर्थ्य संपन्न राजाला संयमाचे बंधनांत ठेवला तरच ठीक. नाहींतर हा बेताल होऊन इंद्रियावर वाटेल तशी सत्ता चालवितो आणि माणसाला जगांतून उठवतो, असें आपल्या इकडील तत्ववेत्त्यांचें म्हणणें आहे व हेंहि सर्वसामान्य झालें आहे. पण या बलाढ्य मनोराजाला वळवावयाचें कसें? हाच मोटा प्रश्न आहे. त्याचें चांचल्य व वाममार्गी गति ही अनावर असते याचा अनुभव कुणाला नाहीं?—म्हणजे तें चांगल्या मार्गाकडे जातच नाहीं, असें मात्र नाहीं. ज्ञानेंद्रियाकरवीं चांगल्याच गोष्टी ग्रहण केल्या, चांगल्याच संगतींत राहिलें आणि चांगल्या आचरणाचा ध्यास घेतला तर मन, कष्टानें कां होईना, तिकडे वळतें. मग त्याला मंदगतीनें तीच संवय जडते आणि मग ती त्याच्या अंगवळणीं पडते. अशी भगवद्गीतेची शिकवण आहे व ती योग्य आहे, असें आजच्या शास्त्रीय

विचारसरणीनें सिद्ध झालेलें आहे. अर्थात् या साऱ्या क्रियेंत फार कष्ट आहेत. प्रथम कांहीं काल तर हें सारें आपल्या आवांक्याच्या बाहेर आहे, असाच माणसाला भ्रम होतो. चुकार मन ह्या असल्या संधीला टपून बसलेलें असतें. वाममार्गी जाण्यास तें अत्यंत उत्कंठ असतें. माणसानें आपल्यांतील विचारप्रवणता जागृत ठेऊन अभ्यास करीत राहिलें पाहिजे.

वरील विवेचनावरून हें दिसून येईल कीं, मनाला दोन गति आहेत. किंवा प्रवृत्ति आहेत. खालीं जाण्याची त्याची प्रवृत्ति अगदीं सहज आहे. वर जाण्याची महान् कठिण आहे. यावरून शोध करतां करतां अर्वाचीन मानसशास्त्रज्ञांनीं मनाचे दोन भाग कल्पिले. एक प्रबुद्ध किंवा आत्मबोधित ( Conscious ) मन आणि दुसरें अप्रबुद्ध वा अनात्मबोधित ( Sub-conscious ) मन. आत्मबोधित किंवा ज्याची जाणीव राखून आपण जीवनक्रिया आचरतों, तें मन स्वभावतः लहान असून डोक्याच्या पुढच्या भागांत आहे. आणि अनात्मबोधित मन हें मोठें असून फार बलिष्ट आहे. हें डोक्याच्या मागच्या भागांत राहातें.

दुहेरी मनाचें स्वरूप असें आहे.

आतां आणखी एक उपमा घेऊन दुहेरी मनाचें स्वरूप आणखी स्पष्ट समजून घेऊं. प्रबुद्ध मनाचा भाग हा एक कारखाना असून, या कारखान्यास लागणारा कच्चा माल सांठविण्याचें कोठार म्हणजे मेंदूचा मागचा भाग उर्फ अप्रबुद्ध मनाचें निवासस्थान होय. मात्र हा कारखाना लहान असून, त्याचें कोठार फारच जंगी आहे.

या कारखान्याचा व त्याच्या कोठाराचा मालक मनुष्य आहे. व्यक्तिमात्राचें हें कोठार व कारखाना एकाच स्वरूपाचा ( कदाचित् ) असला तरी प्रत्येकास तो स्वतंत्र आहे, हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. या कारखान्यांत जीवरूपी लोहार आपल्या आचरण, विचार, विकार,

इत्यादि क्रियारूप गोष्टींची घडामोड करीत असतो. त्यास लागणाऱ्या जिनसांचा पुरवठा पलीकडच्या कोठारांतून होत आहे. आपण आपल्या कारखान्यांत कोणकोणत्या गोष्टी बनवीत आहों याची जाणीव लोहारास आहे; परंतु आपल्याच मालकीच्या पलीकडच्या कोठारांत कोणकोणती संपत्ति ठेंचून भरली आहे, याची त्यास जाणीव नाहीं, किंवा याचें त्यास विस्मरण पडलें आहे. कोठार बंद नाहीं; पण तें अंधकारमय व अजस्र असल्यामुळें आंत काय काय भरलें आहे हें समजण्यास मार्ग नाहीं, आणि लोहार आपण होऊन त्यासंबंधीं कधीं प्रयत्न करीत नाहीं. त्यामुळें तो कदाचित् मोठ्या संपत्तीचा मालक असूनहि दरिद्री असेल.

तुझें आहे तुजपाशीं । परि तूं जागा चुकलासी ।।

अशीच जीवाची स्थिति झालेली नाहीं काय? थोडासा विचार केल्यास आणि मनुष्यानें शांतपणें स्वतःच्या आचाराविचारांची छाननी केल्यास त्यास याचा अनुभव येईल. आपल्या अंतर्गत मनाची शक्ति व त्यांत भरलेली संपत्ति याची आपणास खरोखर जाणीव नाहीं.

आपल्या या अंतर्गत चिच्छक्तीची मनुष्यास जाणीव नसली तरी त्याचें तें गूढ मन आपल्या कोठारांतून नानाप्रकारचा माल वरचेवर बाहेरच्या कारखान्यांत टाकून, तेथून शरीरावर व पर्यायानें मनुष्यावर आपली हुकमत चालवीत आहे.

या बाबतींत मनुष्यास पृथ्वीची उपमा दिल्यास विशेष शोभेल. पृथ्वीच्या स्वरूपाविषयीं शास्त्रज्ञ असें सांगतात कीं, तिचा पृष्ठभाग म्हणजे एक पातळसें कवच असून आंत खालीं भयंकर उष्णता धगधगते आहे. अर्थात बाह्य कवचाच्या सौम्यपणावरून तिच्या पोटांतील विलक्षण स्वरूपाचा कांहीं उलगडा होणें शक्य नाहीं. बस् ! हाच नियम मनुष्यास लागू आहे. त्याच्या मनाच्या सौम्य स्वरूपावरून त्याच्या खऱ्या स्वभावाची ओळख

होणार नाहीं. कारण पातळ कवचाखालींच वर सांगितलेलें विकारी मन आपल्या विलक्षण शक्तीनें सारखें धगधगतें आहे.

आपल्या भोंवतालच्याच मनुष्यांच्या हालचालीकडे पाहावें. कोणी एकाएकीं मोठीं तडफ दाखवितो, कोणी अगदीं अनपेक्षित असा गुन्हा करतो. कोणी कल्पनातीत असें अचाट कृत्य करून दाखवितो, तर कोणी आपल्या कार्यांत अचूक फसून मातीमोल होतो. आज जो अत्यंत विश्वासू तोच उद्यां पहिल्या प्रतीचा लफंग्या! ज्याला आपण मोठे धार्मिक समजतों, तोच पुन्हा पाहावें तों पाजीपणाचा पुतळा होऊन बसतो! हा सर्व चमत्कार कशानें घडतो बरें? तर आंतील ज्वलत् विकारांचा ज्वालामुखी एकदम पेट घेत असतो त्यामुळें!

दुसऱ्याचें राहो; मनुष्यानें स्वतःच्याच मनाचा पडताळा घ्यावा! केव्हां केव्हां आपलें मन एखाद्या विकारानें किती उच्छृंखल बनतें! अधमतेला पोंचविणारे, किती वाईटसाईट अत्यंत तिरस्कारार्ह असे विचार आपल्या डोक्यांत थैमान घालूं लागतात! पुष्कळ वेळां आपण मनुष्य-रूपांत आचारविचारानें व्याघ्रापेक्षा क्रूर, पिशाच्चापेक्षां नीच, सर्पापेक्षां दुष्ट किंवा गर्दभापेक्षाहि मूर्ख बनत नाहीं काय? अलबत् बनतों! हें थैमान कोणाचें असतें? त्या आपल्या मनराजाचेंच नाहीं काय?

कित्येक क्रिया आपण किती आपोआप व बिनचूक करीत असतों, याची आपणास जाणीव नसते. उदाहरणार्थ, ज्या जागेंतून रात्रंदिवस फिरण्याचा आपणास सराव असतो, त्या जागेंतून आपण अगदीं गाढ अंधारांतहि बेधडक जातों. त्या स्थितींत आपण सखल भागांत पाय हलकेच टाकतों, उंचवटा सहजीं चढतों. एखादा खळगा किंवा धोंडा चुकवावयाचा असल्यास खात्रीनें चुकवितों. आणि या सर्व गोष्टी आपण बेभानपणें करीत

असतो ! हें कसें घडतें ? हा सर्व त्या मोठ्या मनाचा खेळ आहे. त्यानें शरीरास व इंद्रियांस तशाच तारा पोंचविलेल्या असतात.

तेंच आपणांस माहीत नसलेल्या जागेंत पाहा. चांगल्या उजेडांतहि आपणांस भान ठेवून चालावें लागतें आणि तें थोडेसें चुकल्यास आपण अडखळतों किंवा ठेंच खतों. उदाहरणादाखल ही एक चालण्याची क्रिया घेतली; परंतु आपल्या दर्शेंद्रियाकडून घडणाऱ्या कोणत्याहि क्रियेंत हाच प्रकार अनुभवास येतो. म्हणजे ज्याची आपणांस संवय जडलेली असते, ज्याचा आपणास सराव असतो, ती गोष्ट त्यापूर्वी त्या मोठ्या मनामध्यें पूर्ण ठसलेली असते. तेथें जर ती कायम झालेली नसेल तर मनुष्यास ती सहज उरकतां येत नाहीं. अभ्यासानें ती त्यास साध्य करून घ्यावी लागते.

यावरून काय सिद्ध झालें ? मनुष्यानें आपल्या या मोठ्या मनाचें स्मरण ठेवून, आपल्या संवयींत, शीलांत, आचारविचारांत चांगल्या गोष्टी आणण्याचा अभ्यास केला पाहिजे. प्रथम कष्ट कां पडतात याचें कारण वर दिलेंच आहे; पण एकवार ते कष्ट सोसल्यावर ती गोष्ट आपल्या किती अंगभूत होते याचेंहि वर्णन वर आलेंच आहे.

समजा, आपली वाणी मधुर, सत्यप्रिय, कोमल, तेजस्वी व्हावी अशी आपली इच्छा आहे. आपण ज्या गोष्टीचा सारखा अभ्यास केला तर मोठ्या मनांत ती गोष्ट दृढ होऊन बसेल, मग तेथून आपल्या वाणीला प्रत्येक बोलण्याचे वेळीं तशाच तारा सुटतील. त्यानंतर आपल्या तोंडांतून निघणारा कोणताहि शब्द मधुर, सत्ययुक्त, कोमल असाच निघेल. कारण ती संवय झाली ! तो गुण आपल्या अंगभूत होऊन बसला ! कांहीं मंडळीं-मध्यें एखादा चांगला वा वाईट गुण त्यांच्या अगदीं अंगभूत होतो, रोम-रोमांत भिनतो, याचें कारण हेंच होय.

आतां मनुष्यास मानसिक त्रास कां होतो तें पाहूं.

मनुष्यावर येणारीं संकटें म्हणा, अडचणी म्हणा, दुःखें म्हणा. अपमान म्हणा अगर अपयश म्हणा हें त्याच्या अपेक्षेबाहेरचें असतें, त्याची त्यास पूर्वसूचना नसते. त्यामुळें मोठ्या मनांत त्यास जागा नसते. अर्थात् ही अपरिचित, अनपेक्षित गोष्ट प्राप्त झाली असता जोड्यांत अडकलेल्या खड्याप्रमाणें किंवा अंगरख्यात शिरलेल्या ढेंकणाप्रमाणें ती सारखी टोंचत, बोंचत, चावत राहाते! या तिच्या सततच्या टाकीनें मोठ्या मनावर ती दृढ होऊं लागते व कालांतरानें ती अंगभूत होते! झालें!! दुःखाची तार आपली आपणच जडवून घेतल्यामुळें प्रसंगोप्रसंगीं ती हालूं लागते व आपल्या मागचें दुःख कधींच संपत नाहीं.

याचा आणखी एक वाईट परिणाम होतो. एखादें दुःख असह्य असलें किंवा भासलें म्हणजे तें नाहींसें करून टाकण्याकरितां आपलें मोठें मन विकाराची मोठी उचल खातें. आपल्या हातून क्षुल्लक अपराधाच्या परिमार्जनार्थ मोठा अपराध घडून येतो. मुलानें लहानसा अपराध केला व त्यास माराची भीति असेल तर तें खोटें बोलण्यास तात्काळ प्रवृत्त होतें. कां? मोठ्या मनाची उचल!

भीति! भीति!! हें एक फार मोठें कारण आहे.

पुष्कळ माणसांना वेड लागतें याचेंहि असेंच आहे! मोठ्या मनाची कांहीं तरी उलथापालथ झालेली असते. दोषिक तापांत मनुष्यास वात होत असतो. संतापानें मनुष्य उन्मत्त होतो. अति आनंदानेंहि त्यास वेड लागतें, दुःखानें तो एकदम खचतो, भीतीनें पांढराफट होतो, अपयशानें मरणप्राय होतो, इत्यादि सर्व गोष्टींचें एकच कारण आहे. मोठ्या मनाची (Sub-conscious self) समतोलता बिघडते! त्यास कोठेंतरी अचका बसलेला असतो! पाठींत उसण भरल्यानें जसें सारें अंग अवघडतें व यत्किंचित् हालचाल करणेंहि कठीण जातें, तद्वतच मोठ्या मनाची उसण

आपणास वेड लावते, किंवा दुर्बल करते, किंवा बेफाम करते, किंवा मरण देते !

तसें पाहिलें तर अत्यंत समतोल वृत्तीचा मनुष्य जगामध्यें अत्यंत दुर्मिळ आहे ! जवळ जवळ नाहींच. अगदीं सूज्ञांतला सूज्ञ सुद्धां कोठेंतरी वेडा असतो, केव्हां तरी उन्मत्त होण्याचा संभव असतो, धडधडीत सत्य गोष्टीला असत्य मानीत असतो आणि बुद्धीपेक्षां भावनेला जास्त प्राधान्य देतो !

व्यक्तिमात्रामध्यें हा चमत्कार दिसून येतो. बाहेरून सर्व सारखे सौम्य वाटतात; पण त्यांच्या अंतरंगांत विकाराविकारांचा, विचाराविचारांचा, कल्पनाकल्पनांचा झगडा सुरू असतो. याच झगड्यांनून अहंकार, पश्चात्ताप, निराशा, उत्साह, उद्योगप्रवणता, आळस या गोष्टी बाहेर पडत असतात.

व्यक्तिमात्राच्या द्विदल मनाचे असे चमत्कार आहेत ! त्यांची आंतली व्यवस्था कशी लावावी, एवढें जर मनुष्यास कळेल तर तो 'नर का नारायण' होईल हें काय सांगायला पाहिजे ? थोरांची चरित्रें हेंच दर्शवीत नाहींत काय ?

## २

प्रत्येकांत ध्येयप्रवणता आहे.

मूळ पुस्तकातील हा मथळा आहे. पण त्यात बराच दुरान्वय वाटतो. म्हणून माझ्या मतें 'मनुष्यमात्र मनोराज्यप्रिय आहे.' असे मानलेलें विशेष चांगलें. मुळांतला हेतूहि तसाच आहे. पुढील विवेचन त्याला धरून आहे.

मनोराज्य करणें कोणास नको आहे ? मनुष्यमात्र कोणत्याहि स्थितींत असो, मनोराज्य करणें हा त्याचा गुणधर्मच आहे. तो दुःखानें गांजलेला असो किंवा सुखानें रंगलेला असो; दारिद्र्यानें पीडिलेला असो किंवा

श्रीमंतींत रमलेला असो; तो झोंपडींत असो कीं राजवाड्यांत असो; रोगानें ग्रस्त झालेला असो किंवा आरोग्यानें मस्त झालेला असो; त्यास कांहींतरी व कमलेंतरी मनोराज्य करणें आवडतेंच आवडतें. सर्व कालीं, सर्व स्थळीं सर्व देशांत हा नियम लागू आहे. कोठेंही, केव्हांही आणि कोणीहि यांतून मुक्त नाहीं.

मनोराज्य! मनुष्याच्या कल्पनामय मनाची ही किती अद्भुतरम्य अवस्था आहे.

कांचसामानाचें दुकान घालून बसलेल्या व पडल्या पडल्या मनोराज्य करणाऱ्या शेखमहंमदाची गोष्ट कोणास माहीत नाहीं ? बिचारा शेखमहंमद! मनोराज्यांत मोठ्या संपत्तीचा मालक झाला ! राजाच्या मुलीशीं त्यानें विवाह केला ! तेवढ्यानेंही त्यास संतोष झाला नाहीं, तर कल्पनामय सुंदर दृश्यांत त्यानें राजकन्येस ( स्वपत्नीस ) लाथेनें झुगारण्याचें धाडस केलें ! परिणाम काय झाला ? मनोराज्याचें मूळ जो कांचसामानाचा हारा त्यावरच त्याची ती बेगुमान लाथ बसली ! कांचसामानाच्या चुऱ्याबरोबरच त्याच्या मनोराज्याचाहि चक्काचूर झाला !

शेखमहंमदाच्या या वेडेपणास आपण बहुतेक हंसत असतो ! अशा धर्तीचे विचार कोणी बोलून दाखविल्यास त्यास शेखमहंमदाची गोष्ट सांगून त्याचा उपहासही करितो; परंतु खरेंच सांगा वाचकांनो ! शेख-महंमदाप्रमाणें मनोराज्य करून त्यांत दंग होणारे व वस्तुस्थितीला विसरणारे त्याचे भाऊबंद तुमच्या आमच्यामध्यें सगळेच नाहींत काय ? खास आहेत ! प्रत्येक व्यक्ति मनोराज्यांत दंग होत असते आणि प्रत्ये-काची ती टोलेजंग इमारत क्षणांत उभारली जाते व क्षणांत मातीला मिळत असते !

मनोराज्य करणें इतकें सोपें कां आहे ? त्यांत श्रमाचा किंवा पैशाचा प्रश्न नाहीं म्हणून ! बसल्या ठायीं तुम्ही वाटेल ती रम्य, अद्भुत, शक्य

किंवा अशक्य कल्पना मनांत आणा; तिच्या पूर्तीकरितां तुम्हास जागचे हालायला नको कीं द्रव्याकरितां खिशांत हात घालायला नको. कोणीं पाहिला नाहीं असा—ताजमहालापेक्षां सुंदर आणि कोणत्याही कोरीव लेण्यापेक्षां भव्य— राजवाडा तुम्हांस सहजीं उठवतां येईल. तुम्ही कल्पना केल्यास त्याचे तुम्ही मालक होऊं शकाल आणि तुमच्या वारस हक्कांत तुम्हास कोणी अडथळाहि करणार नाहीं. मनाच्या या सर्व खेळाचे तुम्ही एकटेच मालक आहां !

पण या मनांतील मांड्यांना व्यवहारांत उपयोग काय ? मनोराज्यांतील कुबेरास लाजविणाऱ्या या धनवंताला सत्य सृष्टींत एका पैशाची भाजी तरी मिळेल काय ? केव्हाहि नाहीं. भासमय कल्पनेला भासमयच सौख्य. मनुष्यास हें कळतें, पण वळत मात्र नाहीं. आपलें मनोराज्य पुष्कळसें व्यर्थ आहे, याची चांगली जाणीव असूनही मनुष्य मनोराज्य करणें टाकीत नाहीं. कां ? मानवस्वभावदर्शनाचा तो एक सिद्धान्त आहे.

मनोराज्य करण्याचा गुणधर्म मनुष्याच्या अंगीं इतका बाणलेला आहे कीं, तो नाकारतां येतच नाहीं. कारण, त्याचा प्रभाव व्यक्तिमात्राचे ठिकाणीं दिसून येत आहे. आतां सर्वांचें मनोराज्य एकाच तऱ्हेचें नसतें हेंही खरें आहे. असो.

मागें सांगितलेंच आहे कीं, व्यक्तिमात्र विकारी आहे व विचारीही. त्याचप्रमाणें त्याचें मनोराज्यही द्विविध आहे. तें चांगलें असेल किंवा वाईट असेल, स्वार्थी असेल किंवा परार्थी असेल आणि हितकारी असेल किंवा विनाशकारी असेल ! मनाच्या योग्यतेवर ही गोष्ट अवलंबून आहे.

या बाबतींत एक गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. सुखाच्या ज्या साधनापासून मनुष्य दूर असतो, त्याच साधनाचीं भडक चित्रें रंगविण्याची त्यास हौस असते. वृद्धास तारुण्याची, दरिद्यास श्रीमतीची आणि निरा-

श्रितास प्रेमाची किती गोडी वाटत असते ! जें हातांत नाहीं त्याबद्दल तळमळण्याची आणि तें खास सुंदर आहे अशा कल्पनेनें त्याजकडे धांवण्याचीच मनाची नेहमीं प्रवृत्ति असते. दिव्यावर पतंग झडप घालतो त्यांतलीच ही गत !

वरील गोष्ट सत्य असली तरी व मनुष्याला त्याची जाणीव होऊन त्रास होत असला तरी तो तें टाळूं शकत नाहीं. कारण, कल्पनेचें सौख्य त्याच्या जीनवक्रमास आवश्यक आहे.

आमचीं सुखस्वप्नें–आमचें मनोराज्य–नसतें तर ! मनुष्याचें जीवन कष्टाचें झालें असतें. दारिद्र्याचा काच सारखा मानेला लागला असतां मनानें जर मनोराज्यांत कुबेराच्या संपत्तीची उलाढाल केली नसती तर ! तें दारिद्र्य, ती दुरावस्था प्राणांतिक झाली असती !

अरबी भाषेंतील सुरस गोष्टी धडधडीत असत्यांनीं भरल्या असतां आज कित्येक शतकें त्या सर्व राष्ट्रांतील लोकांना कां बरें आवडत आहेत ! मेघदूतासारखें काव्य आपली मति कां बरें गुंग करतें ? केवळ मनोराज्याचे ते देखावे आहेत म्हणून !

कोणत्याहि राष्ट्राचें बालवाङ्मय ( Folklore ) पाहा; त्यांत अद्भुत-रम्य गोष्टींचाच भरणा आहे ! नंदनवनें, अप्सरांच्या टोळ्या, अमृताचे झरे, चिरतारुण्य, अलोट संपत्ती इत्यादि सत्यसृष्टींत क्वचितच आढळणाऱ्या गोष्टींचें पुनः पुनः वर्णन करण्यास मनुष्यास कधींहि कंटाळा येत नाहीं. किंबहुना फावल्या वेळीं आपल्या सर्व दुःखांना बाजूला सारून मनोराज्याचा मानसिक आनंद लुटण्यांतच व्यक्तिमात्रास आनंद वाटत असतो. यावरून मनुष्य सत्यापेक्षां कल्पनेस कसें महत्व देतो ही गोष्ट सिद्ध होते. त्यामुळें तो कोणतें मनोराज्य कितपत खरें होईल याचा फारसा विचार करीत नाहीं. तें अमलांत यावें असें मात्र त्यास वाटत असतें, आणि त्याकरितां तो झटतहि असतो. कारण सत्यसृष्टींत येईपर्यंत आपलें मनोराज्य व्यर्थ आहे,

ही गोष्टहि तो जाणून असतो. म्हणून तें सत्य करण्याकरितां तो प्रयत्नही करितो. या प्रयत्नांचा परिणाम म्हणजेच शूर, वीर, कवि, कल्पक, वेडे, सत्पुरुष, लोकनायक, तिरसट, धर्मनिष्ठ, स्वामिभक्त इत्यादि विविध लोकांची पैदास होय. जो तो आपल्या योग्यतेनुरूप मनोराज्य करितो आणि त्याचा परिणाम त्याच्या आचारांत, उच्चारांत व कर्तव्यांत दिसून येतो.

व्यक्तिमात्राची ही ध्येयप्रवणता म्हणा किंवा मनोराज्य करण्याची चटक म्हणा, व्यक्तीप्रमाणेंच समाजाला व राष्ट्रालाहि आहे. ज्यांचें मनोराज्य मोठें, तरी त्यांची कृति आणि तसें त्यांचें वैभव आपोआप वाढत जातें. युरोपातील राष्ट्रांचा व जपानचा उत्कर्ष हीं त्याचीं प्रत्यक्ष उदाहरणें आहेत.

मनोराज्य करितां करितां व मानवीस्वभाव पाहून ध्येयप्रवण लोकांनीं कांहीं सुंदर तत्त्वें निर्माण केलेलीं आहेत. समता, बंधुता, स्वतंत्रता हें पाश्चिमात्य ध्येय व गांधीवादांतील सत्यप्रियता व अहिंसा हें ध्येय एक सुंदर मनोराज्यच आहे. अर्थात् तीं जगांत प्रत्यक्ष दिसूं लागतील तो सुदिन !

व्यक्तिमात्राकडून निर्माण झालेलीं अनेक मनोराज्यें मुळापेक्षांहि जास्त सुंदर, जास्त प्रभावी व परिणामकारक झालीं आहेत. आरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टी आज शास्त्रीय शोधांनीं प्रत्यक्षांत आलेल्या आहेत!—तोच अनुभव आणखी येईल. व्यक्तीनें ध्यानांत ठेवायचें हें कीं मनोराज्य करणें वाईट नाहीं. पण तें भविष्यकाळीं वांझ न ठरेल असें असावें. आपल्या शक्तिबुद्धीच्या आटोक्याबाहेरची कांहींतरी अद्‌भुत कल्पना रचण्यांत कांहीं अर्थ नाहीं. त्या बाबतींत प्रयत्न करतां येत नाहीत; आले तरी ते विफल होतात. आणि मनाची शक्ति मात्र व्यर्थ खर्ची पडते. तेंच मनोराज्य आपल्या आटोक्यांतील असेल आणि त्यास प्रयत्नाची जोड मिळेल तर खात्रीनें यश मिळेल !

# प्रकरण चवदावें

## १

**मानवस्वभावाचें मानचित्र.**




[ कॅसन महाशयांच्या मूळ आकृतीवरून. ]

वरील मानचित्र मानवस्वभावाचें विहंगमावलोकन करण्यास उपयुक्त होईल. यांत चार अवस्था दिग्दर्शित केल्या असून मानव मात्राच्या गुणाव गुणांचा उत्कर्ष व अपकर्ष कसकसा होतो आणि मनुष्यानें अवधान न ठेवल्यास शेवट वेडांत होण्याचा कसा संभव आहे, याचें आटोपशीर चित्र आहे. तें पूर्ण नाहीं; पण मार्मिक नक्की आहे. कॅसन महाशयांच्या

विचारांना अनुसरून असें दिसतें कीं, मनुष्य हा मूळांत एक अज्ञानी जीव आहे. पशुपक्ष्यादि जीवांप्रमाणें. ही अज्ञानाची पहिली अवस्था होय. या जाड वर्तुलानतर मनुष्यांत परिस्थितीप्रमाणें निरनिराळया गुणांचा प्रादुर्भाव होतो. मूळच्या इंग्रजी नकाशांत सोळा घरांत सोळा गुण घेतले आहेत. वर दिलेल्या आकृतींत आठच घेतले आहेत. हेतु एवढाच कीं आकृति गिचमीड होऊं नये. दिलेल्या आठ गुणांवरूनहि मानचित्राची कल्पना स्पष्ट होण्यासारखी आहे. यावरून सोळा, बत्तीस, चौसष्ट अशीं घरें पाडूनहि मानवगुणांची विविधता दाखवितां येण्यासारखी आहे.

अज्ञानाची अवस्था संपली कीं स्वभावदर्शक गुणांची अवस्था चालू होते. पण हिलाहि मर्यादा आहे म्हणून दुसऱ्या जाड वर्तुळानें ती दाखविली. गुणांनीं ही मर्यादा ओलांडली कीं, ते दोषरूप बनूं लागतात. खरेंच आहे—स्वातंत्र्याचा अतिरेक म्हणजेच स्वैराचार ! प्रेमाचा तोल सुटला कीं लंपटता ! अति सावधानता म्हणजेच भीति ! श्रद्धेचे वेडें रूपांतर धर्मभोळेपणा. अत्यंत आदराचे पर्यवसान गुलामी वृत्तींत, असा प्रकार आहे. निरनिराळया गुणांचा हा अतिरेक कोण अमान्य करील ? माणुसकीची मर्यादा सुटली कीं राक्षस किंवा पिशाच्च निर्माण व्हावयाचें हें निश्चित होय.

पण या बेताल अवस्थेलाहि मर्यादा आहे. ती तिसऱ्या जाड वर्तुलापर्यंत. त्यानंतर वेडाचीच अवस्था. जन्मतः वेडे असणाऱ्यांची गोष्ट वगळल्यास बाकीच्या वेड्या माणसाची अवस्था या पद्धतीनेंच घडत असावी असें दिसतें. अर्थात् त्या त्या लोकांना योग्य उपचार केले तर पुन्हां उलट गतीनें त्याची सुधारणा होण्यासहि अडचण पडत नाहीं. सर्वांचीच सुधारणा होते अशांतला भाग नाहीं. पण पुष्कळ लोक बरे होतात हें कांहीं खोटें नाहीं.

माझ्या मतें या मानचित्राचा खरा उपयोग करतां येईल. संसारी माणसांना, जीवन यशस्वी करू पाहाणाऱ्या समंजस लोकांना स्वतः कोण

कोणत्या गोष्टींना अगावयाचें आणि आपल्या कक्षेतील आप्तस्वकीयांना व इष्टमित्रांनाहि कसें सांभाळून घ्यावयाचें हें यावरून सहज कळण्यासारखें आहे. ती जाणीव मात्र असली पाहिजे.

## २

आपण आह्मीं माणसें ! या नामाभिधानानें उपन्यास करून तुम्ही आम्ही ( म्हणजे मनुष्यमात्र ) काय चीज आहों ? आपल्या सर्वांच्यामध्यें विविधता व वैचित्र्य किती आहे ? आणि इतकें असूनहि आपणांसर्वांमध्यें प्रामुख्यानें कोणकोणत्या शिरा समानत्वानें वाहात आहेत, याचा प्रपंच यथामति केला. आतां सुलभतेकरितां केलेल्या विचारांचें सिंहावलोकन करूं.

पहिला सिद्धान्त—मनुष्यमात्र गरजवन्त आहे हा त्यानंतर, त्यांत विकार प्राबल्य केवढें दांडगें आहे, हें पाहून भीति या विकाराची छाया सर्वांवर कशी पसरली आहे, याचें विवेचन केलें. त्यापुढें, प्रत्येकांत अनुकरणप्रवणता असल्यामुळें मानव स्वभाव कसा बनला आहे ह्याचा शोध घेत, व्यक्तिमात्रांतील वेगळेपण त्यांच्या आंगठ्यावर कसें कोरलें आहे आणि त्यांच्यांत अहंकार कसा ठासून भरला आहे, हें सांगितलें. यानंतर माणूस कितीहि सुधारला, पुढारला व ज्ञानी झाला तरी त्याच्या मनांत अंधविश्वासाचा गड्डा कसा बळकट आहे, याची छाननी करीत आपण त्यांच्यांतील विचार प्रवणतेकडे वळलों.

असे सात सिद्धान्त आत्मसात् केल्यावर आपण ' व्यक्तिमात्रांतील संवय-बद्धता ' ध्यानीं घेतली आणि नंतर सृष्टीमध्यें चालू असलेलें स्थित्यंतर-क्रांति वा फेरबदल-माणसालाहि कसें लागू आहे, हें पाहिलें. यानंतर आपण माणसें स्तुतीला कां हापापलेले असतो व त्या प्रमाणांत आपल्यास निंदाहि कितपत उपयुक्त असते, याचा विचार केला. मग

आपण वळलों, माणसाला पुढारी कां हवा ?—प्रत्येकांत असलेल्या लिंगभेदाचें महत्त्व आणि व्यक्तिमात्रांत वसणारें दुहेरी मन यांकडे. आणि असा फेरफटका करीत आपण शेवटचा टप्पा गांठला; व्यक्तिमात्र मनोराज्यप्रिय कसें आहे ? हा !

हे चौदा तुकडे नीट तपासल्यावर काय ध्यानीं येतें ? आपल्या इकडील तत्त्वज्ञानाप्रमाणें मनुष्यमात्रांत ज्या तीन ईषणा आहेत, त्यांचींच विस्तृत रूपें म्हणजे वरील चौदा सिद्धान्त नाहीं का ? प्रजा. धन. कीर्ति. याकरितां धडपड म्हणजे मानवी जीवन. आणि त्याला धरून मानवस्वभाव !

## ३

जीवनांतील आडेभरडे चपेटके सोसतां सोसतां उबग आला आहे का तुम्हांला ?—कीं माणुसकीवर विसंबून ज्याचा हात पकडलांत तो राक्षस वाटला ? घरांत पत्नी कां रुसली ? मुलें कां ऐकत नाहींत ? वडीलधारीं माणसें असें कां वागतात ? याचें कोडें वाटतें का ? रोजच्या व्यवहारांत देवदत्त घमेंडखोर कां ?—नोकरीपेशांत असलेला गोविंदराव भेदरट कां ?—माधवरावांना या कसल्या संवयी ?—एकनाथ बढाया कां मारतो ?—बळवनराव इतका धोरणी कसा ? शामरावांत असा फेरबदल कां झाला ?—अवंतीबाई अमुक स्वामींच्या मागें कां लागल्या ? सौदामिनीचें पुनर्विवाहित नवऱ्याशीं इतकें प्रेम कसें जुळलें ?–अशोककुमार एकाएकीं कां बिघडला ?–अविनाशानें काळी मिचकूट बायको कां पत्करली ?—इत्यादि अनेक कां व कसे ?—तुमच्या मनांत घोळत असतील आणि त्यामुळें तुमच्या मनांत बरीवाईट खळबळ माजली असेल तर, खंतू नका. विचारात पडूं नका. गोंधळूं नका, कीं विषाद मानूं नका. मुकाट बाजूला व्हा आणि मानव स्वभावाचा चित्रपट अंतःचक्षूपुढें धरून गंमत पाहा. दोषैक दृष्टीनें नव्हे.

गुणांच्या विविधतेचें योग्य मोल ठरविण्याकरितां जीवनाचा खेळ समजून घेण्याकरितां कर्तव्य उमजण्याकरितां दुसऱ्यास न्याय देण्याकरितां

संबंध आलेल्या व्यक्ति रक्तसंबंधाच्या असोत, आप्तस्वकीयांतील असोत, केवळ परिचयांतील असोत किंवा अवचित गांठ पडलेल्या असोत. साऱ्याचें नाट्य व अभिनय खेळाडूपणानें पाहा. पार्श्वभूमि समजावून घ्या, आणि संगीत कान देऊन ऐका. आणि हें चालू असतानांच हें ध्यानांत घ्या कीं, समोर चाललेल्या चित्रपटांत माझें स्वतःचें स्थान कुठेंतरी आहे. मीहि कांहींतरी विशेष सोंग घेतलें असून त्यास अनुरूप अभिनय करतों आहे. माझेंहि वाटप कोणीतरी पाहातें आहे.

अशी तद्रूपता झाली तर—निसंशय मजा वाटेल. मनाचा भार हलका होईल. बिकट प्रश्न सुटतील वा सुलभ होतील. जीवनाची गुनागुंत आकळू लागेल. इतरांची थोडीफार पारख होईल आणि स्वतःची योग्यता तपासून पाहातां येईल.

मग हंसत म्हणाल : आपण आहों माणसें !

## ४

मागेंच सांगून ठेविलें आहे कीं, भगवद्गीता हा मानसशास्त्रावरील अपूर्व ग्रंथ आहे. मानवस्वभावाचें दर्शन घेतांना संदर्भाकरितां या ग्रंथाकडे थोडा दृष्टिपात करणें वावगें होणार नाहीं ज्याना अभ्यास करणें असेल, त्यांनींही महान् ग्रंथ सारखा चाळावा, त्यातील अभ्यास आड न येता पूरक होईल, जीवनाकडे पाहाण्याची एक नवी वाट सांपडेल.

या प्रकरणाच्या प्रारंभीं जें मानचित्र दिलें आहे, त्यांत अज्ञान मूळ धरलें आहे. पण तें बुद्धीला पटण्यासारखें नाहीं. अज्ञानाच्या काळोखांतून गुणांचा विकास होणें संभवत नाहीं. मनुष्यजातीपैकीं अनेक लोकांनीं—थोरपदास चढलेल्या अवतारी पुरुषानीं वा महात्म्यांनीं—माणूस हा देवपदास

शोचूं शकतो, हें सिद्ध केलें आहे. अर्थात् मुळांत देवत्वाचें बीज असलेंच पाहिजे.

नासतो विद्यते भावो ना भावो विद्यते सतः ।

जें मुळांतच नाहीं तें आस्तित्वांत येणें शक्य नाहीं. आणि जें आहे तें नाहींसें होणें शक्य नाहीं—असें गीतेचे सांगणें आहे.

म्हणूनच आमच्या तत्त्वज्ञानाप्रमाणें जीवमात्र हा सच्चिदानंद स्वरूप अशा परमात्म्याचाच अंश आहे, असें म्हटलें. मात्र तो मायेनें-अज्ञानानें-लिडबिडलेला आहे. ती माया जीवमात्रानें स्वस्वरूप ओळखून झाडून टाकली पाहिजे. मनुष्यजन्माचें खरें सार्थक यांत आहे.

पूर्वसंस्कार, शिक्षण, संगत व परिस्थिति या चार गोष्टी जशा असतील तसा मनुष्य बनतो हें तत्त्व आजचें आहे; पण तें पूर्वकालींहि मान्य असल्याचें दिसतें. महाभारतकार म्हणतात—

प्रज्ञा प्रतिष्ठा भूतानां प्रज्ञा लाभः परो मतः ।
प्रज्ञा निःश्रेयसी लोके प्रज्ञा स्वर्गो मतः सताम् ॥

ज्ञान हाच प्राण्यांचा आधार आहे. ज्ञान हाच उत्कृष्ट असा लाभ आहे. इहलोकीं ज्ञान हेंच मोक्षाला कारण आहे. ज्ञान हाच प्रत्यक्ष स्वर्ग आहे, असें सज्जनाचें मत आहे.

असें आहे तर मग माणसाचें मन तिकडे कां वळत नाहीं ? कारण त्याची विषयसुखाकडे असलेली अनावर प्रवृत्ति ! आणि ही कामक्रोधादि विकारांच्या प्राबल्यानें वरचेवर उकाळते. या दृष्टीनें गीतेंतील अध्याय दुसरा समग्र लक्षपूर्वक वाचावा, नीट समजून घ्यावा. ६२ व ६३ हे श्लोक पुनः पुन्हा वाचावे. म्हणजे माणसाच्या अधःपताचें कारण कळेल. आणि त्याच्याच पुढेच दोन श्लोक वाचल्यास तें संकट टाळण्याची युक्तीहि सांपडेल.

आजकालच्या युरोपीय मानसशास्त्रज्ञानीं मनासंबंधीं ज्या ज्या कल्पना सांगितल्या आहेत, त्यांपैकीं बहुतेक गीतेंत आल्या असून त्यांचा कार्य-कारणभावहि समजावून दिला आहे. मानवस्वभावाच्या त्यांनीं तीन पायऱ्या सांगितल्या आहेत. सात्विक, राजस, तामस. मानवमात्राच्या साऱ्या कृति, आचारविचार या त्रिकुटाला धरून असतात. याचप्रमाणें सर्व मानव जीवनाच्या दोन तऱ्हा. एक दैवी संपदेला धरून आणि दुसरी आसुरी संपदेला धरून. हा भाग समजून घ्यायचा असल्यास गीतेंतील सोळा, सतरा व आठवा हे अध्याय वाचावे. यांतील शिकवण सहज आकलन होण्यासारखी असून पूर्ण व्यवहार्य आहे.

एक गोष्ट लक्षांत घ्यायची मोक्ष शब्दाला बुजायचें नाहीं. त्याला चिकटलेला पारमार्थिक अर्थ—टोंचेल त्याला व त्यानें—खुशाल नाकारावा. मोक्ष म्हणजे स्वातंत्र्य असा अर्थ घेऊन चालावें. उपयोग नक्की होईल' लाभहानी, सुख दुःख, आशा निराशा, जयापजय इत्यादि द्वंद्वापासून मुक्त होऊन अबाधित असें स्वातंत्र्य मिळविणें, ही गोष्ट सामान्य नाहीं. पाश्चिमात्य मानसशास्त्रज्ञ हेंच सांगतात. भाषेचा, विचार प्रदर्शित करण्याचा, पर्याय वेगळा इतकेंच—. आम्हीं तसा विचार केला पाहिजे.

कॅसन महाशयांचाच समारोप सांगतों. आपल्याकडे 'पिंडी ते ब्रह्मांडी' अशी म्हण आहे. या म्हणी प्रमाणेंच कॅसन महाशयांना मानव स्वभावाचे पैलू' शोधून पाहाताना अनुभव आला. त्यांनीं पाडलेले चौदा पैलू त्याना त्यांच्या कुत्र्यात, इतर पशुपक्षांत, बागेंतील फुल झाडांत, भोंवतालच्या सृष्टींत आढळले. एवढेंच नव्हे, सूर्य चंद्रहि गोलांत, ताऱ्यात व दूरदूरच्या तेजोमेघांतहि ते असावे असें त्यांना निश्चित वाटूं लागलें. मग त्यानीं ठरवून टाकलें कीं, प्रकृति ( Matter ) आणि पुरुष ( Force ) हें द्वंद्व मानण्यांतसुद्धां स्वारस्य नाहीं. सर्व कांहीं एकच आहे असें कांहीं सरी—सच्चिदानंद स्वरूप आहे.

# फलश्रुति !

## माणूस — कालचा.
## ,, — आजचा.
## ,, — उद्यांचा.

ज्यांची मैत्री दीर्घकाल टिकली आहे असे दोन स्नेही कांहीं कालानें भेटल्यावर त्यांच्या गप्पांना मोठाच रंग चढतो, नाहीं? त्यांना किती तरी बोलावयाचें-सांगायचें असतें, गप्पा मारायच्या असतात, आणि परस्परांचें हृदय समजून घ्यायचें असतें. अर्थात् या गोष्टी क्रमानें घडाव्या म्हणून कांहीं त्याची बैठक जमत नाहीं. कांहीं काल एकमेकांच्या संमतींत राहावें व यथेच्छ बोलावें एवढाच हेतु. मग त्यांत गोष्टीवरून गोष्टी निघतात. गतकालच्या आठवणी, चालू कालचे जीवन, आणि भावी कालांतील योजना-सहजींच बोलल्या जातात.

अगदीं याच न्यायानें चालू प्रबन्धाची फलश्रुति सांगावी असें वाटतें. मानवमात्राचें जे चरित्र वा स्वभावचित्र आपण पाहिलें, त्याच्या-कडे पाहातां पाहातां—

कालचा माणूस कसा होता? हा विचार मनांत येतो. चालू विसावें शतक म्हणजे मानवजातीच्या सुधारणेचा कळसच नव्हे काय? वा झगझगीत प्रकाशांतून कालच्या मानवजातीकडे पाहिल्यास काय आढळतें? जों जों मागें जावें, तों तों अंधारच अंधार! अज्ञान, विकारप्राबल्य, भीति, अंधविश्वास, स्वार्थ इत्यादि तमोमय गुणांनीं माणूस किती रानटी, किती हिंसक नी किती मूर्ख वाटतो? इतिहासाचीं पानेंच्या पानें रंगलेलीं दिसतात! अंगावर शहारे येतील, विस्मय वाटेल, खेद होईल, संताप वाढेल असाच सारा देखावा!—आणि अशा जंजाळातच काय दिसतें?— श्रीकृष्ण गीतामृताचा कुंभ अखिल मानवजातीच्या उद्धारार्थ भरून ठेवीत

आहे ! दयाशील सिद्धार्थ अहिंसेचें तत्वज्ञान जगांत पसरविण्याची मुहूर्तमेढ रोवीत आहे ! येशुख्रिस्त जगांतील पापक्षालनार्थ क्रूसावर जात आहे, आणि महात्मा महम्मद एका रानटी राष्ट्राला नवजीवन देत आहे !

मग कालचा माणूस चांगला कीं वाईट ? देव कीं दानव ? ज्ञानी कीं अज्ञानी ?

* * *

आणि हा पाहा आजचा माणूस ! शास्त्रीय शोधांच्या ऋद्धि-सिद्धी अखिल मानवाच्या सेवेंत तत्पर आहेत ! चमत्कार असा कसलाच राहिलेला नाहीं. धर्माची आवश्यकता वाटेनाशी झाली आहे ! कांहीं समाजांचें व राष्ट्रांचें वैभव अष्टदिशा ओसंडत आहे ! Man is the noblest work of God ! अशी शेखी मिरविण्यांत येत आहे !

पण हें सारें चित्र खरें–समाधानकारक आहे का ?—युद्धांची परंपरा अखंड चाललेली आहे ! १९१४ चें महायुद्ध मानवजातीच्या इभ्रतीला काळिमा आणणारें घडलें असें म्हणतात ! त्यानें मानवाच्या सुधारणेचा, संस्कृतीचा, ज्ञानाचा पायाच उखडून काढला म्हणतात ! परस्परांच्या विश्वासाची गोष्टच नको !— अशा अवस्थेंत पंचवीस वर्षें लोटली नाहींत तोंच पूर्वापेक्षा जास्त मोठा, जास्त हिंसक असा युद्धाचा डोंब उसळला आहे. आणि त्यांत पडलेले दोघेहि सुंदोपसुंद म्हणतात—मानवजातीच्या उद्धारार्थ आम्हीं आपलें रक्त सांडीत आहोंत ! जगाचें नंदनवन आम्हांला बनवावयाचें आहे ! साऱ्या मानवांना देवरूप द्यावयाचें आहे.

खरें का हें ?— भारताची दुर्दशा काय सांगते ?— महात्मा-गांधीजींचीं काय स्थिति आहे ?

And much it greives my heart to find
What *Man* has done of *Man*.

हीं कौपरची उक्ति आजहि आक्रंदते आहे !

मग या जगाचा वाली कोण ?— आजचा सुधारलेला — पुढारलेला मानव म्हणतां येईल ?— लज्जेनें खालीं मान घालण्याचाच प्रसंग !— खरा शहाणा दुर्बल आहे ! असहाय आहे ! ढोंगी निर्लज्ज आहे ! सबल आहे ! जगताचा अडलेला बेडा कसा पार पडायचा !

पण विचारवन्तांची, आजच्या तत्त्ववेत्यांची समजूत आहे कीं यांतून भावीकाल सुवर्णयुग ठरेल ! मनुष्य समंजस—समाधान होईल. आणि शांतिसुखाचें साम्राज्य जगावर पसरेल !

वाटल्यास विश्वास ठेवावा !— वरील गोड आशा मात्र गोरकायांची आहे हें लक्षांत घेण्यासारखें आहे. आणि चालू युद्धाचा ज्वालामुखी शांत होण्याच्या आंतच तिसऱ्या महायुद्धाचीं त्याना स्वप्नें पडूं लागलीं आहेत !

असा हा सुधारलेला माणूस, मागच्या कालाकडे पाहून म्हणतो : तें अंधारयुग होतें. माणूस पशुतुल्य होता !

उद्याचा माणूस खराच देवतुल्य निघणार असेल ? तसं वाटत नाहीं ! त्याचा स्वभावच तसा नाहीं ! विकाराची वावटळ उठलीं कीं संपलें ! तत्त्वज्ञानाची बाष्कळ बडबड करीत तो राक्षस बनतो ! सुंदर विचारांच्या वस्त्रालंकारात अधमाधम कृत्यें करतो !

कालचा माणूस जसा होता, तसाच आजचा आहे व उद्यांचाहि तसा निघणार आहे. ठराविक बीज ठराविक वृक्ष आणि ठराविक फळ !— कारण एकच—

## आपण आहों माणसें

